मनोहर—ग्रंथमाला—प्रकाशन ६० वें

# टालडुप्पो वाँगिमाडूऽऽ

लेखक : डॉ. अनंत वामन वर्टी

विजयादशमी,
शके १८७२



२० आक्टोबर,
सन १९५०

किंमत ३ रुपये

# अनुक्रमणिका

# १. टालडुप्पो वाँगिमाडूऽ

" टालडुप्पो वाँगिमाडूऊऽ पाडपुप्टु कामदाच्चूऊऽऽ!" विसू म्हणाला.

" काय ? " मी विचारलें.

" टाऽलडुउप्पोऽ वाँगिमाडूऊऽअ पाडपुप्टु काऽमदाच्चूऊऽऽअ ! " कमालीचे मद्रासी हेल काढून विसू म्हणाला आणि स्वतःच पोट धर-धरून हंसूं लागला.

मलाहि हंसू आवरेना. हंसून झाल्यावर विसू म्हणाला, " हेंच तें वाक्य, कीं ज्या वाक्यानं माझ्या आयुष्यांत ती महत्त्वाची घटना घडवून आणली ! "

" काय म्हणतोस! ह्या वाक्यामुळं तुझं त्या मद्रासी पोरीशी लग्न झालं ? " मी विचारलें.

" लग्न झालं म्हणण्यापेक्षां करावं लागलं असं म्हण ! "

" काय आहे त्या वाक्याचा अर्थ ? "

" त्या वाक्याचा अर्थ ? " विसू म्हणाला, " सांगतों. पण त्याआधीं सुरुवातीपासूनच सुरुवात करतों. म्हणजे तुला त्या वाक्याचा अर्थ आपोआपच कळेल. "

—विसू हा माझा लहानपणचा शाळुसोबती. पण बहुतेक शाळुसोबती मोठे झाले कीं त्यांचा एकमेकांशीं असलेला संबंध तुटतो. त्यांचे धंदे निरनिराळे होतात. ते निरनिराळ्या गांवीं जातात. त्यांच्या आवडी-निवडी, मतं हीहि निरनिराळीं होतात. विसूच्या आणि माझ्या बाब-तींतहि हाच प्रकार झाला होता. मी झालों होतों डॉक्टर नि विसू

झाला होता रेडिओचा व्यापारी आम्ही एकाच गांवांत राहत होतों. तथापि खावंप्यावं, लग्न करावं, संसार करावा, मजा मारावी ह्या मताचा मी होतों; तर देशाचं स्वातंत्र्यसंपादन, देशभक्ति नि ब्रह्मचर्य-पालन हेंच माणसाचं जीवितकार्य आहे, ह्या मताचा विसू होता. अर्थात् त्याचा--माझा संबंध क्वचित्‌च येई. व्यावसायिक दृष्टयादेखील त्याचा नि माझा संबंध येण्याचा कांहींच संभव नव्हता. तो ब्रम्हचारी होता अर्थात् त्याला 'फॅमिली' नव्हती; म्हणजे 'फॅमिली डॉक्टर'चीहि त्याला जरूरी नव्हती. त्याच्या स्वतःच्या प्रकृतीविषयीं म्हणाल तर तो होता ब्रम्हचारी! आणि त्या ब्रम्हचर्यपालनामुळें त्याची प्रकृतीहि चांगली टुणटुणीत होती. साहजिकच आज जेव्हां तो माझ्या दवा-खान्यांत आला तेव्हां आम्ही एकमेकांना निदान दोनतीन वर्षांनंतर तरी भेटत होतों.

बाकीच्या पेशंटांचं काम आटोपेपर्यंत मी त्याला मुद्दामच बसवून ठेवलं. म्हटलं, नंतर त्याच्याशी जरा निवांतपणानं बोलूं. सारं काम आटोपल्यावर मीं त्याला विचारलं, "काय विश्वनाथराव, आज इकडे कुठं वाट चुकलांत?"

"औषध घ्यायलाच आलोंय्."

"अस्सं?" त्याच्या टुणटुणीत प्रकृतीकडे पाहत मीं आश्चर्योद्गार काढले आणि विचारलं, "कुणाचं?"

"बायकोचं"

"बायकोचं? कुणाच्या?"

"कुणाच्या म्हणजे? माझ्या! दुसऱ्यांच्या बायकांच्या औषधाची उठाठेव मी कशाला करीन?"

"क्षमा कर. मला वाटलं, तूं अजून ब्रम्हचारीच आहेस!" मी म्हणालों.

" माझं आतां लग्न झालं आहे ! "

" आणि आम्हांला कळवलंहि नाहींस ! "

" लग्न झालं रजिस्टर पद्धतीनं नि जरा घाईघाईंतच. "

" तरीपण आपल्या बाळमित्राला तूं कळवूं नयेस ? " गहिंवरल्या गळयानं मीं विचारलं.

माझ्या प्रश्नानं त्याचा जरा गोंधळ उडालेला दिसला. 'रेशनिंग', 'पाकिस्तान' 'कम्युनिस्ट' वगैरे शब्द घालून त्यानं कांहीं तरी खुलासा केला. फारशी कटकट न करतां मींहि तो ग्राह्य मानला. नंतर त्याच्या बायकोचं औषध करून दिलं. औषधाची बाटली त्याच्या हातांत देतांना मी म्हटलं, " मला नव्हतं वाटलं, ब्रह्मचर्याश्रम सोडून तूं गृहस्थाश्रमांत बिऱ्हाड थाटशील म्हणून ! "

" कां ? "

" तूं ब्रह्मचर्य एवढ्या निष्ठेनं पाळत होतास—"

" पण आतां स्वराज्य मिळालं आहे ना ! "

" हो हो. तें माझ्या लक्षांतच नव्हतं आलं ! " त्याचा हाहि खुलासा मीं मान्य केला. तेवढ्यांत माझं लक्ष त्याच्या हातांतील एका गुंडाळलेल्या मासिकाकडे गेलं.

" कुठलं मासिक आहे तें ? " मीं विचारलं.

" तुझ्या उपयोगी नाहीं तें ! " विसू म्हणाला.

" हं हं. समजलं. " मी म्हणालों, " आतां तुझं लग्न झालंय, तेव्हां असेल एखादं कामशास्त्रावरचं ! "

" छे, छे ! तसं मुळींच नाहीं ! तें एक तामीळ मासिक आहे. "

" तामीळ ! " मी आश्चर्यानं म्हणालों. " तूं कधींपासून तामीळ भाषेचा पंडित झालास बुवा ? "

" माझं तामीळ भाषेचं ज्ञान ग्रीक व लॅटिन भाषांइतकंच आहे ! ..

स्पष्टच सांगायचं म्हणजे तामीळ भाषेतलं अवाक्षरहि मला कळत नाहीं!"

"मग हें तामीळ मासिक कशाला आणलंस?"

"आमच्या सौ. करितां."

"तुझी सौ. तामीळ कधीं शिकली?"

"जन्मापासून! म्हणजे तिची मातृभाषा तामीळ आहे."

"अँ! म्हणजे तुझी बायको मद्रासी आहे?"

"हा तुझा निष्कर्ष बरोबर आहे."

"आज तूं मला एखाद्या बॅटरीसारखे एकामागून एक आश्चर्याचे धक्के काय देतो आहेस? कसं जमलं तुझं ह्या मद्रासी पोरीशीं?"

विसूनं एकदम कांहींच उत्तर दिलं नाही कुठल्यातरी स्मृतींनीं त्याच्या मनांत गर्दी केली असावी. मग थोड्या वेळानं त्याला वाचा फुटली आणि त्यानं ते सुरुवातीस दिलेले तामीळ शब्द उच्चारले, "टालडुप्पो वाँगिमाडुऊ ऽ पाऽडपुप्टु कामदाञ्चूऊऽअ!"

चहा मागवल्यावर विसूनं आपली हकीगत सांगावयास सुरुवात केली. तो म्हणाला—

तुला माहीतच आहे, की स्वराज्य मिळेपर्यंत ब्रम्हचर्यपालन करण्याची प्रतिज्ञा मी शाळेत असतांनाच केली होती. मी साधारण चोवीस वर्षांचा होईपर्यंत ही प्रतिज्ञा पाळणं मला विशेषसं अवघड गेलं नाहीं. पण नंतर मात्र ह्या प्रतिज्ञेचं पालन करणं मला चांगलंच जड जाऊं लागलं. मला जीवन अपुरं वाटूं लागलं. स्त्रीसहवासाची आंतरिक ओढ प्रबळ होऊं लागली. हिंदुस्थानला केव्हां एकदां स्वराज्य मिळेल असं मला होऊन गेलं होतं. अशीच प्रतिज्ञा करून, खंगूनखंगून मेलेल्या कांहीं ब्रम्हचाऱ्यांचीं उदाहरणं माझ्या डोळ्यांसमोर होतीं. कधींकधीं वाटे— आपलीहि तीच अवस्था होणार नाही ना? जसे आपण ब्रम्हचारी

जन्मलों, तसे ब्रम्हचारीच मरणार काय? आपणाला कान असूनहि स्त्रीच्या प्रेमळ कुजबूजीचं मधुर कूजन त्यांना कधीच ऐकायला मिळणार नाहीं काय? आपल्या ह्या कमावलेल्या वक्षस्थळाला स्त्रीच्या डोक्याचं नाजूक ओझं कधींच साहावं लागणार नाहीं काय? आपल्या ओठांना अमृत पिण्याकरितां स्वर्गातच जावं लागणार काय? साहेब हिंदुस्थानला कधीं स्वराज्य देणारच नाहीं का?'...असे विचार मनांत आले कीं जिवाचा थरकांप होई आणि अगदीं कळवळून मी देवाची प्रार्थना करी कीं, "हे प्रभो, कांहींहि करून माझ्या देशाला स्वातंत्र्य दे."

ज्या दिवशीं एका दाढीवाल्या देशभक्ताच्या नादीं लागून मीं ब्रह्मचर्यपालनाची प्रतिज्ञा करण्याची अरबी घोडचूक केली, तो दिवस माझ्या आयुष्यांत उगवलाच नसता तर किती बरं झालं असतं, हा विचार मनांत वरचेवर येई आणि माझं हृदय अंधःकारानं भरून जाई.

पण देवानं अखेर ह्या ब्रह्मचाऱ्याची प्रार्थना ऐकली. त्यानं लॉर्ड माउंटबॅटन ह्या नांवाचा एक देवदूत हिंदुस्थानला स्वराज्याची देणगी देण्याकरितां पाठवून दिला. काय होतंय् हें कळण्यापूर्वींच हिंदुस्थानला स्वराज्य मिळूनहि गेलं होतं! काय झालं होतं कुणास ठाऊक! कदाचित् माऊंटबॅटनसाहेबहि माझ्यासारखीच एखादी भयंकर प्रतिज्ञा करून बसले असावेत! कारण हिंदुस्थानला स्वराज्य मिळावं म्हणून माझ्या-पेक्षांहि त्यांनाच अधिक घाई झालेली दिसत होती!

तें कांहीं का असेना, सांगण्याचा इत्यर्थ इतकाच, कीं जेव्हां मी करकऱ्यांच्या वाड्यांत राहावयास आलों, तेव्हां मी ब्रह्मचर्यपालनाच्या भयंकर प्रतिज्ञेंतून मुक्त झालों होतों. दीर्घ मुदतीच्या तापानंतर एके दिवशीं एकदम खडखडीत बरं वाटूं लागावं तसं मला एकदम मोकळं-मोकळं वाटूं लागलं होतं. सारं जीवन उत्साहानं भरलेलं, जिकडेतिकडे

प्रकाश–प्रकाश, मागील परसांत सुखाचे डोंगर–असं कांहींसं माझ्या त्या वेळच्या मन:स्थितीचं वर्णन करतां आलं असतं. करकऱ्यांच्या वाड्यांत आल्याबरोबर आजुबाजूच्या प्रदेशाची मीं एका विवक्षित दृष्टीनं पाहणी केली. स्पष्टच सांगतों, आसमंतांत, मीं जिच्यावर माझ्या सांचलेल्या प्रेमाची उधळपट्टी करावी अशी एखादी छोकरी आहे का हें पाहण्याकरितांच मी माझ्या शेजारावरून ही शोधज्योति फिरवली होती. माझी कल्पना होती, ज्या जगन्नियंत्यानं माझ्यावर एवढं कृपाळु होऊन मला त्या भयंकर प्रतिज्ञेंतून अवचित मुक्त केलं होतं, त्यानंच करकऱ्यांच्या वाड्यांतल्या इतर बिऱ्हाडांतून चारपांच विविध प्रकारच्या सौंदर्यवती षोडशी माझ्या निवडीकरितां आणून ठेवल्या असतील म्हणून !

पण कसचं काय नि कसचं काय! करकऱ्यांचा वाडा ह्या बाबतींत अगदीं कोरा करकरीतच होता. माझ्या अगदीं शेजारीं दोन खोल्यांतून एक वृद्ध निपुत्रिक जोडपं राहत होतं. ह्या निपुत्रिक जोडप्यानं आपल्या सांसारिक कर्तव्यांत जी कुचराई केली होती ती त्यांच्या शेजारच्या बिऱ्हाडकरूंनीं भरून काढली होती. पण त्यांच्या विवाहयोग्य वयाच्या मुलींची तर कधींच लग्नं होऊन गेलीं होती आणि ह्या कुटुंबांत आतां ज्या मुली शिल्लक राहिल्या होत्या त्या एवढ्या लहान होत्या, कीं माझ्या दृष्टीनं त्यांची दखल घ्यायलादेखील कितीतरी दिवस लागते. मोठ्या आशेनं मीं तिसऱ्या बिऱ्हाडाकडे पाहिलं. त्या बिऱ्हाडाच्या दरवाजावरील नांवाची पाटी मीं पाहिली मात्र—माझी उरलीसुरली सर्व आशा नष्ट झाली.

त्या पाटीवर नांव होतं—के. सुब्रमण्यम् अय्यर !

मद्रासी कुटुंब ! ह्या कुटुंबांत एक सतराअठरा वर्षांची मुलगी होती हें खरं. पण माझ्यासारख्या महाराष्ट्रियाला या उंडुगुंडू मद्रासी पोरीचा

उपयोग काय? मीं ज्या विवक्षित दृष्टीनं वाड्याची टेहळणी करत होतों, त्या टेहळणीच्या कक्षेंतच मुळी हें कुटुंब येत नव्हतं.

आपणाला जी खटपट करायची ती ह्या वाड्याच्या चतुःसीमेच्या बाहेरच, असा मी निष्कर्ष काढला. मीं घरीं असलों कीं खोलीच्या बाहेर क्वचित्च डोकावून पाही. एकदोनदां ती मद्रासी पोरगी मला दिसली होती! पण मद्रासी पोरीत पाहण्यासारखं तें काय असणार, ह्या विचारानं मी तिच्याकडे पुरतं पाहिलंहि नाहीं. खोलींतला वेळ कंटाळवाणा जाऊं नये म्हणून मीं एक रेडिओ आणून ठेवला होता. जेव्हां जेव्हां माझी लहर लागे, तेव्हां तेव्हां मी रेडिओ लावून तो ऐकत बसें. उत्तमोत्तम शास्त्रीय संगीत, मराठी नाटिका, बातम्या आणि हिंदी-मराठी चित्रपटसंगीत ऐकण्यांत माझा वेळ—निदान रात्रीं अकरा वाजे-पर्यंत तरी—ठीक जाई.

एक दिवस संध्याकाळचा मी असाच अगदींच वेळ जाईना म्हणून खेडुताचा कार्यक्रम ऐकत बसलों. तेवढ्यांत दरवाज्यावर टिक्‌टिक् ऐकूं आली. किंचित् दचकूनच मी दरवाज्याकडे पाहिलं—पाहतों तों ती मद्रासी पोरगी उभी!

"क्या होना?" मीं हिंदींत विचारलं.

"जरा आंत येऊं का?" तिनं शुद्ध मराठींत विचारलं.

"या कीं!" ती एवढं चांगलं मराठी बोलते ह्याचं आश्चर्य करीत मी म्हणालों.

ती आंत आली आणि एका खुर्चीवर बसली. मग ती म्हणाली "तुमच्या कामांत व्यत्यय तर नाहीं ना आला?"

"छे छे! मुळीच नाहीं. रेडिओ तर ऐकत बसलों होतों. काय काम आहे आपलं?" मी विचारलं.

"मला जरा रेडिओ ऐकायचा आहे." ती पोरगी शालीनतेनं म्हणाली.

" मग ऐका कीं. " मी म्हणालों.

" हें नको. जरा 'तिरुची' लावा. " ती म्हणाली.

" तिरुची ! " मी उद्‌गारलों. तो शब्द ऐकून माझ्या अंगावर कांटा उभा राहिला होता.

" होय. कित्ती दिवस झाले, आमचा रेडिओ बिघडल्यापासून तामीळ कार्यक्रम ऐकला नाहीं. ह्या तुमच्या मराठी देशांत कधीं तामीळ ऐकायलाहि मिळत नाहीं. त्यामुळं कसं अगदीं चुकल्याचुकल्यासारखं वाटतं ! " ती म्हणाली.

मीं भीतभीत कांटा 'तिरुची 'वर सरकवला. रेडिओंतून एकदम मद्रासी संगीताचीं भेंडोळीं बाहेर पडूं लागलीं. त्या माऱ्यानं मी दोन पावलं मागंच सरकलों. रेडिओ म्हणजे माझं खेळणं होतं. मुंबई, दिल्ली, कलकत्ता, पेशावर—फार कशाला लंडन, न्यूयॉर्क, बर्लिन वगैरे सर्व ठिकाणीं मी त्यावरून सफरी करून येई. पण कधीं चुकूनसुद्धां मी मद्रास आणि तिरुची वगैरे मद्रासी स्टेशनांच्या वाटेला जात नसें.

पांचएक मिनिटं झालीं आणि मला वाटूं लागलं, आपण स्टेट ट्रान्स-पोर्टच्या बसनं नाशिक–पुणें प्रवास करीत आहोंत. रेडिओंतून बाहेर पडणाऱ्या त्या मद्रासी शास्त्रीय संगीताच्या खडखडाटानं माझ्या कान-ठळ्या बसून गेल्या. मला गिरगिरल्यासारखं वाटूं लागलं. मीं त्या मद्रकन्येकडे पाहिलं. तें गायन (हुं ! ) ऐकून ती मान डोलवीत होती. जणूं काय तिची ब्रम्हानंदीं टाळी लागली होती. मीं आपले डोळे मिटून घेतले आणि आरामखुर्चीत स्वस्थ रेलून पडलों.

तिरुची स्टेशनच्या बाबतींत कुठली एकच गोष्ट मला एकदम पसंत असेल तर ती ही, कीं तें स्टेशन दहालाच बंद होतं. म्हणजे इतर कांहीं स्टेशनांच्या तासभर आधींच. दहा वाजतां मी ह्या अरिष्टांतून मोकळा

होणार होतों. दहा केव्हां वाजतात इकडे सारं लक्ष केंद्रित करून मी बसलों होतों.

अखेरीस दहा वाजले. तिरुची बंद झालं आणि त्या मुलीचे शब्द माझ्या कानांवर आले, "बरं, येतें मी आतां. बराच त्रास झाला तुम्हांला, नाहीं?"

"छे छे! मुळींच त्रास झाला नाहीं मला." मी म्हणालों. सभ्यता माणसाला किती खोटं बोलायला लावते! मला खरं म्हणायचं होतं, 'खरंच. खूपच त्रास झाला. हें संगीत असंच आणखी पंधरा मिनिटं चाललं असतं, तर मीं हा रेडिओच फोडून टाकला असता, नाहींतर एक वेडा ह्या खोलींतून बाहेर पडला असता!'

"हा गेला तास दीड तास माझा किती आनंदांत गेला म्हणून सांगूं! जशी कांहीं मी अगदीं तिरुचीतच आहें असं वाटत होतं मला. फार आभारी आहें मी आपली!" ती पोरगी म्हणाली आणि मग ती निघून गेली.

तिची पाठ वळतांच मी रेडिओचा कांटा सर्‌कन् सरकवला. माझ्या सुदैवानं त्याच वेळीं लखनौला 'आपकी फर्माईश' होती. चित्रपटांतलीं मधुर गाणीं ऐकतांना मी मघाचं तें मद्रासी संगीत आणि ती मद्रकन्या ह्यांना पार विसरून गेलों.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं ती मद्रसुंदरी पुन्हां आली.

"येऊं का आंत?" तिनं विचारलं.

"या ना!" मीं म्हटलं. पण मला म्हणायचं होतं, 'नको!'

"आज तिरुचीला मुन्नुस्वामींचं गोटुवाद्यम् आहे!" मुन्नुस्वामि म्हणजे साक्षात् तुंबरूच अशा ऐटींत ती म्हणाली.

"हो का? मग लावा ना तिरुची!" वरवर आनंदानं पण आंतून निराशेच्या दाट अंध:कारांत चाचपडत मी म्हणालों.

मुन्नुस्वामींचं गोट्टुवाद्यम् सुरू झालं. गोट्टुवाद्यवादनाची मुन्नु-स्वामींनी कमाल केली. जणूं बेटयाला ठाऊक होतं, की तिरुचीपासून पांच सातशें मैलांवर एक पोरगी आपलं गोट्टुवाद्यवादनम् ऐकण्याकरितां रेडिओला कान लावून बसली आहे. एवढ्या उत्साहानं तो गोट्टुवाद्यम् वाजवत होता की मला वाटलं, एखादे वेळ कांही तांत्रिक नादुरुस्ती-मुळं तिरुची स्टेशन बंद पडलं तरी आपलं गोट्टुवाद्यम् त्या पोरीला ऐकू जावं अशी काळजी घेत होता तो!

अर्थात्च माझ्या कानांच्या पडद्यांची काय अवस्था झाली असेल ह्याची तुला कल्पना येईलच. हा श्राव्य अत्याचार माझ्यावर पांचएक मिनिटं झाल्यावर मीं धीर करून त्या पोरीला विचारलं, "आपण पाटणा लावूंया का? तिथं सायगलच्या प्लेटी आहेत!"

तिनं मानेनंच नकार दिला. मुन्नुस्वामींचं गोट्टुवाद्यवादनम् चालूच राहिलं आणि माझ्या खोलीच्या भिंतींना हादरे बसतच राहिले!

ह्या जगांत एवढं एक बरं आहे, की कितीहि भयंकर गोष्ट असली तरी तिला शेवट असतोच. मुन्नुस्वामि थकले म्हणून म्हणा किंवा त्यांचं गोट्टुवाद्यम् मोडलं म्हणून म्हणा, पण एकदांचा हा कार्यक्रम संपला आणि मीं एक सुटकेचा निःश्वास सोडला. मग माझे आभार मानून ती छोकरी निघून गेली.

त्यानंतर रोजच ती मद्रसुंदरी माझ्या खोलीवर येऊं लागली. आतां ती 'येऊं का आंत?' म्हणून माझी परवानगीहि विचारेनाशी झाली होती. आपली सरळ आंत येई, नि 'तिरुची' लावून माना डोलावीत बसून राही.

तिच्याविषयीं मला उत्सुकता होती म्हणून तर नव्हेच—मद्रासी पोरीविषयीं उत्सुकता वाटण्याचं मला कारण काय?–पण तिचं तिरुची स्टेशन थोडा वेळ तरी बंद पाडावं ह्या उद्देशानं मग मीं तिच्याशीं

संभाषण उकरून काढायला सुरुवात केली. रेडिओचा आवाज लहान करून मीं विचारलं, "तुझं नांव काय?"

"चेंचुलक्ष्मी." ती म्हणाली.

तें नांव ऐकल्यावर संभाषण पुढं चालू ठेवण्यांत विशेषसा अर्थ नाहीं असं मला वाटलं. पण तेवढ्यांत तिनं रेडिओ मोठा केला आणि त्यांतून मद्रासी संगीताचे लोट बाहेर पडूं लागले. तेव्हां मीं रेडिओ परत लहान केला आणि विचारलं, "तुझे वडील काय करतात?"

"एम् ए. त आहेत ते," ती म्हणाली.

ह्या मद्राशांच्या चिकाटीविषयी मला नेहमींच कौतुक वाटे; पण श्री. के. सु. अय्यर ह्यांनीं त्या वयांत देखील एम् ए होण्याची महत्त्वाकांक्षा बाळगावी ह्याचं मला फारच कौतुक वाटलं. मी म्हणालों, "तुम्हां मद्रासी लोकांची चिकाटी जब्बर बुवा! कदाचित् हा तुमच्या संगीताचा परिणाम असेल!"

"कां?" चेंचुलक्ष्मीनं आश्चर्यानं विचारलं.

"अजून तुझे वडील एम्. ए. चा अभ्यास करताहेत?"

"अहो, एम्. ए. म्हणजे कॉलेजांतलं एम्. ए. नव्हे!" मोठ्यानं हंसून चेंचुलक्ष्मी म्हणाली, "मिलिटरी अकाउंटस्!"

आज झालं एवढं संभाषण पुरे झालं असं मला वाटलं. मुकाट्यानं तिरुचीच्या अत्याचाराला कान देण्याखेरीज आतां गत्यंतर नव्हतं.

चेंचुलक्ष्मी रोजच येत राहिली. माझी नि तिची आतां ओळखहि चांगली झाली; पण मी तिच्याकडे 'त्या' दृष्टीनं कधींच पाहिलं नाहीं. चेंचुलक्ष्मी माझ्या खोलींत येऊन 'तिरुची' ऐकत बसली काय नि एखादा लुंगीवाला मद्रासी अय्यर येऊन बसला असता काय, मला दोन्ही गोष्टी सारख्याच होत्या. आमच्यांत मनमोकळेपणानं गप्पा चालत. हळूहळू मी तिची नि तिच्या भाषेचीहि थट्टा करूं लागलों–कधीं गंमती-

नं, तर कधीं 'तिरुची' वर चिडून! ह्या गप्पांतूनच मला कळून आलं होतं, कीं चेंचुलक्ष्मीचे वडील नोकरीच्या निमित्तानं तिच्या बालपणींच महाराष्ट्रांत आल्यामुळं तिचं सारं शिक्षण मराठींतूनच झालं होतं. आणि म्हणूनच ती इतकं अस्खलित मराठी बोलूं शके.

अशीच एक दिवस ती आली आणि 'तिरुची' लावून बसली. टेबलावर रेडिओ नसून एखादी मालगाडी आहे असा मला भास झाला. त्या खडखडाटानं चिडून मी विचारलं, " काय चाललंय् हें ? "

" सीताकल्याणम् नाटक. "

" कल्याणम् म्हणजे ? "

" लग्न ! सीताकल्याणम् म्हणजे सीतेचं लग्न."

" पण ह्या नाटकांत सीता नि राम तर कुठच दिसत नाहींत. सारं नाटक रावणानं नि राक्षशिणींनीच बळकावून ठेवलेलं दिसतंय् ! "

" पुरे म्हटलं आमच्या भाषेची थट्टा."

" चेंचुलक्ष्मी—"

" काय ? "

" आतां 'चेंचुलक्ष्मीकल्याणम्' कधीं ? "

" चला !" ती म्हणाली.

'चला' म्हणतांना तिनं जो हावभाव केला, त्यावरून मला एक नवीनच शोध लागला. तो म्हणजे मद्रासी पोरीहि लाजूं शकतात, मद्रासेंतहि गुलाबाचीं झाडं आहेत नि लाजणं मद्रासी पोरींनाहि खुलून दिसतं !

त्यानंतर तिच्या भाषेची मी धीटपणानं टिंगल करूं लागलों. 'तिरुची' रोज ऐकून तिची टिंगल करण्याइतकं तामीळ भाषेचं ज्ञान मला प्राप्त झालं होतं. मला तामीळ भाषेंतल्या एकाहि शब्दाचा अर्थ कळत नव्हता; अजूनहि कळत नाहीं. तरीपण 'ळ', 'ड', 'प' वगैरे अक्षरांच्या बारा-

खडयांतलीं अक्षरं कुठंहि कशींहि दडपलीं तरी तामीळ वाक्यं तयार होतात अशी माझी समजूत होती. मी तामीळ भाषेची अशी टिंगल केली कीं चेंचुलक्ष्मी जी रागावे तीसुद्धां एक गंमतच होती!

पण एक दिवस मात्र प्रकार विचित्रच झाला! त्या दिवशीं तिरुची स्टेशनवर म्हणे पल्लवी निडुमूर्तीचं शास्त्रीय संगीत होतं! कांहीं झालं तरी हें संगीत माझ्या रेडिओवरून प्रक्षेपित होऊं द्यायचं नाहीं असा माझा निश्चय होता. माझ्या कानांचे पडदे जरी आतां रोज 'तिरुची' ऐकून गेंडयाच्या कातडयाइतके जाड बनलेले असले तरी मला माझ्या भारी रेडिओसेटची काळजी होती. पल्लवी निडुमूर्ति! बापरे! पल्लवी निडुमूर्तीनं 'हुहुहु:' करून नुसती पहिली मद्रासी तान मारतांच माझ्या रेडिओचा स्फोट होईल अशी मला भीति वाटत होती. चेंचुलक्ष्मीनं पल्लवी निडुमूर्ति हें भयंकर नांव उच्चारतांच मी ठरवलं, कीं आज चेंचुलक्ष्मीला खूपच चिडवायचं आणि रेडिओ वांचवायचा. आदल्या रात्रीं अंथरुणावर पडल्यापडल्या मीं मनाशींच एक तामीळ वाक्य रचून ठेवलं होतं. तेंच मी आतां उच्चारलं. मद्रासी हेल काढून मीं म्हणालों,

"टालडुप्पोऽ वाँगिमाडूऊऽ पाड्पुप्टु कामदाञ्चूऊ ऽ ऽ!"

मला वाटलं होतं, हें वाक्य ऐकून चेंचुलक्ष्मी नेहमीप्रमाणं खूपच चिडेल. पण प्रकार मात्र उलटच झाला. तिच्या मुखावर स्मिताची प्रभा फांकली होती आणि त्यावर गुलालाचा शिडकाव झाला होता. ती म्हणाली, "इश्श!"

मी पुन्हां तिला चिडवण्याकरितां म्हणालों, "टालडुप्पो ऽ वाँगि-माडूऊ ऽ पाड्पुप्टु काऽमदाञ्चूऊऽऽ!"

ती पुन्हां लाजली आणि म्हणाली, "इश्श! भलतंच कांहींतरी!"

"भलतंच नाहीं!"

"नाहीं? खरंच ?"

"होय, अगदीं खरं !"

"काय ?"

"टालडुप्पोऽ वांगिमाडूऊऽ पाऽडपुप्टु,.."

"पाहा हं !"

"टालडुप्पोऽ वांगिमाडुऊऽऽ...."

"मी बाबांना सांगतें तर !" माझं वाक्य पुरं होण्यापूर्वींच पदर तोंडावर ठेवून आणि खालीं पाहात चेंचुलक्ष्मी म्हणाली आणि लगेच तिनं आपल्या घराकडे धूम ठोकली !

ही काय भानगड झाली आहे मला कांहीच कळेना. तामीळ भाषेचं विडंबन करावं म्हणून मीं तयार केलेल्या त्या वाक्याचा खरोखरीच कांहीं अर्थ होत होता कीं काय ? होत असल्यास तो काय ? मला कांहींच कळेना !

पण मला ह्यावर फार वेळ विचार करत बसावं लागलं नाहीं. कारण, लुंगी गुडाळलेले, बुचड्यासारखी शेंडी मानेवर सोडलेले, आपली केसाळ छाती उघडी टाकलेले आणि पिंजारलेल्या पांढुरक्या मिशांचे श्री. के. सुब्रमण्यम् अय्यर माझ्याकडे एखाद्या राक्षसपाटर्याप्रमाणं दाणदाण पावलं आपटीत आणि तोंडांतून तामीळ शब्दांच्या कठोर गोळ्या सोडीत येत असलेले मला दिसले !

"वॉट्ट ईज्ज धिस्स, मिस्स्टर्र ?" त्यांनीं विचारलं.

"काय ?" मीं विचारलं.

"मला वाटलं होतं, तुम्ही एक सभ्य गृहस्थ आहांत. म्हणून मी माझ्या मुलीला निःशंकपणानं तुमच्याकडे रेडिओ ऐकायला पाठवत होतों. तुम्ही एवढे बेरड असाल, अशी मला कल्पना नव्हती!" हातवारे करीत अय्यर खिकाळले.

"म्हणजे ? " ह्या राक्षसाच्या पोटीं चेंचुलक्ष्मीसारखी पोरगी कशी जन्माला आली असावी, त्याचं मनाशींच आश्चर्य करीत मी विचारलं.

" म्हणजे काय ? तुम्ही माझ्या मुलीचा विनयभंग केला ! तिच्या शीलाचा अपमान केला ! "

" काय, म्हणतां काय तुम्ही ? " मीं गोंधळून विचारलं.

" विनयभंग ! अपमान ! " पुन्हां एकदां श्री. के. अय्यर किंचाळले, " कोर्टांत खेचीन तुम्हांला ! "

" पण झालं काय असं तें तर सांगाल ? " मीं भीतभीत विचारलं.

' तुम्ही माझ्या मुलीला म्हणालां, ' माझं तुझ्यावर प्रेम आहे. तूं माझ्याशीं लग्न करशील का ? ' . . . होय ना ? "

" मीं कुठं असं म्हटलं ? " मनांतल्या मनांत चमकून मीं म्हणालों.

" नाहीं तर काय ? माझी मुलगी काय खोटं बोलते? तुम्हीं चक्क तिला तसं तामीळमध्ये सांगितलं."

" बरं, म्हटलं ! मग त्यांत काय एवढं बिघडलं ? " मी उच्चारलेल्या त्या बनावट तामीळ वाक्याचा अर्थ येवढा भयंकर असावा, ह्या विलक्षण योगायोगाचं आश्चर्य करीत मीं बोलण्याचा हिय्या केला.

" बिघडलं ? कोर्टांत खेचीन तेव्हां समजेल ! " तो लुंगीवाला राक्षस कडाडला, " माझी मुलगी म्हणजे काय खेळणं वाटलं तुम्हांला ? "

" कोण म्हणतो खेळणं आहे म्हणून ? " कांहींतरी उत्तर द्यायला हवं म्हणून मी म्हणालों.

" मग तुम्हीं तिला लग्नाविषयीं विचारलं तें खरं ? मनापासून ? " म्हाताऱ्याचे शब्द मद्रासी इसमाचे शब्द जेवढे मृदु होणं शक्य आहे तेवढे आतां मृदु झाले होते, " तुमचं तिच्यावर खरच प्रेम आहे ? "

" म्हणा ना ' होय ' म्हणून ! " म्हाताऱ्याला काय उत्तर द्यावं ह्याचा

मी विचार करतों आहें तों चेंचुलक्ष्मीचे शब्द माझ्या कानांवर आले. आमची गडबड ऐकून तीहि माझ्या खोलींत येऊन दाखल झाली होती. ती पुढं म्हणाली, " नाहीं तर बाबा तुम्हांला कोर्टात खेचल्यावांचून राहायचे नाहींत ! "

मीं तिच्याकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांवर माझी नजर खिळून राहिली. त्या डोळ्यांत कांहींतरी अद्‌भुत जादू होती. अद्यापपर्यंत एकदांहि ही गोष्ट माझ्या ध्यानांत येऊं नये याचं आश्चर्य करीत असतांनाच एखाद्या मंत्रमुग्धाप्रमाणं मी त्या म्हाताऱ्याला म्हणालों, " मीं म्हणालों तें खरं आहे ! "

"तुमची चेंचूशीं लग्न करायला तयारी आहे ? " जणूं नक्की खात्री करून घेण्याकरितां म्हणून म्हाताऱ्यानं पुन्हां एकदां विचारलं.

मी जरा चुटमळलों. चेंचूनं पुन्हां आपल्या डोळ्यांची मोहिनी माझ्यावर फेंकली. मी म्हणालों, " होय."

आणि मग लवकरच आमचं रजिस्टर पद्धतीनं लग्न झालं!

विसू आपली हकीकत सांगून थकला असावा. तो जरा वेळ स्वस्थ बसून राहिला. त्याला ह्या प्रसंगीं सहानुभूति दाखवणं हें त्याचा शाळुसोबती ह्या नात्यानं आपलं कर्तव्य आहे असं वाटून मीं उद्‌गारलों, "च् च् ! अरेरे ! "

" च् च् अरेरे म्हणजे काय ? " विसूनं विचारलं.

" हे सहानुभूतिदर्शक उद्‌गारवाचक शब्द आहेत. " मी म्हणालों.

" सहानभूति ? हूं ! " सुदाम्यानं कुबेराला सहानुभूति दाखविली तर कुबेर ज्या तुच्छतेनं बोलेल त्या तुच्छतेनं विसू म्हणाला, " मला सहानुभूति दाखविण्याची मुळींच जरूर नाहीं. आमचा संसार जर तूं पाहिलास, तर आमचा हेवा करण्याचीच तुझ्यावर पाळी येईल ! "

"म्हणजे ? " मीं आश्चर्यानं विचारलं.

" चेंचसारखी पत्नी मिळणं हें शतजन्मांचं पुण्य आहे ! " एकदम काव्यात्मकतेनं विसू बोलूं लागला. " चेंचू ! ती तामीळ भाषेंत प्रेमाची कुजबुज करूं लागली कीं कानांत अमृत ओतल्याचा भास होतो. ती त्यागराजाचं तामीळ पद म्हणूं लागली कीं वाटतं – आपण स्वर्गांत आहोंत आणि गंधर्वांचंच गायन ऐकत आहोंत. आणि माझी चेंचू तर साक्षात् अन्नपूर्णा आहे ! " मिटक्या मारीत विसू म्हणाला, " तिच्या हातचं सारम् – अन्नम् खाल्लं कीं त्यापुढं तुमचीं तीं सारीं पक्वान्न फिक्कीं पडतात! आणि इडली आणि डोशा ! " विसू क्षणभर थांबला. कदाचित् तो त्या वेळीं काल्पनिक इडली–डोशे खात असेल किंवा इडली–डोशांचं वर्णन करण्यास त्याचे शब्द अपुरे पडले असतील ! मग आपली दृष्टि शून्यांत लावून तो म्हणाला, " चेंचूनं दोन्ही नाकांच्या दोन्ही बाजूला चमक्या घातल्या आणि आपलं पिवळंतांबडं लुगडं तिनं देहेलतेभोंवतीं मद्रासी पद्धतीनं गुंडाळलं कीं ती किती सुंदर दिसते! उर्वशी, तिलोत्तमांच्या तोंडांत मारील ती ! " मग तो एकदम आवेगानं उद्गारला, " चेंचुलक्ष्मी ! चेंचू! अहाहा! किती कोमल, सुंदर नाजुक नांव आहे हें ! आमचं लग्न झाल्यावर आपणांला एखादं महाराष्ट्रीय सुंदर नांव ठेवा, असा तिनं हट्ट धरला होता. पण मीं म्हटलं, ' तुझ्या चेंचू ह्या नांवापेक्षां आणखी कुठलं सुंदर नांव मराठी भाषेंत असणार?' अहाहा ! किती काव्य भरलं आहे ह्या नांवांत !

' टालडुप्पो वांगिमाडुऽऽ पाडऽपुप्टु काऽमदाञ्चूअऽऽ !' विसू निघून गेला तरी एखाद्या गाण्याच्या कडव्याप्रमाणं हें तामीळ वाक्य माझ्या मनांत सारखं घोळत राहिलं. संध्याकाळीं मी क्लबांत गेलों तरी त्या वाक्यानं माझा पिच्छा सोडला नाहीं. क्लबाच्या व्हरांड्यांत एका वेताच्या खुर्चीवर श्री. नप्पूस्वामी टाईम्स वाचत बसले होते. त्यांना मी म्हणालों,

"श्री. नप्पू, तुमच्या भाषेंतलं एक वाक्य मी आज शिकलों."

"असं ? कुठलं ?" चष्म्याच्या वरून माझ्याकडे पाहत श्री. नप्पूंनीं विचारलं.

"टालडुप्पो वांगिमाडु पाडपुप्टु कामदाच्चूऊऽ!" मी म्हणालों.

"नॉनसेन्स !" श्री. नप्पू म्हणाले.

"छे छे! म्हणजे हें वाक्य ी तुम्हांला उद्देशून बोललों नाहीं. बरोबर आहे का हें वाक्य ?" मग तें वाक्य त्यांना नीट समजावं म्हणून मी मद्रासी हेल काढून म्हणालों,

"टाऽलडुप्पोओऽऽ वांऽगिमाडुऊऽ पाडूपुप्टु काऽमदाच्चुऊऽऽ"

"शट अप् !" प्रेयसीच्या इभ्रतीकरितां 'मारीन किंवा मरेन'च्या पवित्र्यांत श्री. नप्पू ओरडले, "डॉक्टर, तुम्ही स्वतःला मोठे विनोदी समजतां हें मला ठाऊक आहे. पण तुम्हांला सांगून ठेवतो, आमच्या भाषेचं असलं विडंबन मला खपणार नाहीं."

"विडंबन ?" मी म्हणालों. "विडंबन नाही हें. अगदीं सीरिअसली विचारतों—सांगा ना त्या वाक्याचा अर्थ—'टालडुप्पोऽ वांगिमाडु...'

"नॉनसेन्स !" श्री. नप्पू डोळ्यांतून मद्रासी मिरची ओकत म्हणाले. "अट्टर नॉनसेन्स ? हे शब्दच आमच्या भाषेंत नाहींत. मग त्यांत अर्थ कसला ? डॉक्टर, आतां ही पोरकट थट्टा पुरे करा !"

---

# २. खेड्यावळीं माणसं

दवाखाना बंद करून मी घरीं जाण्याच्या बेतांत होतों. येवढ्यांत माझ्या दवाखान्यांत एका खेडुतानं प्रवेश केला. त्याच्यामागून आणखी एक खेडूत आला, त्याच्यामागून आणखी एक आला, त्याच्यामागून आणखी एक...

सिनेमाची वेळ झाली कीं चित्रपटगृहांत एकएक प्रेक्षक जमूं लागावा आणि थोड्याच वेळांत सारं चित्रपटगृह प्रेक्षकांनीं गच्च भरून जावं, तसा माझा दवाखाना खेडुतांनीं भरून गेला. दवाखान्या-बाहेर रस्त्यावरहि आणखी कांहीं खेडूत उभे असलेले मला दिसले असते, तर त्याचंहि मला नवल वाटलं नसतं. माझ्या दवाखान्यांत आज बहुजनसमाजवादी पक्षाची एखादी सभा भरणार आहे, असा कयास जर ती गर्दी पाहून एखाद्या निरीक्षकानं केला असता, तर मीं त्याला दोष दिला नसता.

काम करून मी आधींच थकलों होतों. त्यांत आतां आणखी एवढे लोक तपासायचे हें माझ्या जिवावर आलं. पण निदान दहाच्या दहा-पांच नोटा तरी माझ्या खिशांत जातील, ह्या विचारानं मला थोडा उत्साह वाटला. ती गर्दी पाहून खेड्यांतून कुठल्यातरी रोगाची सां आली असावी असा मी तर्क केला.

कुणी बांकावर तर कुणी जमिनीवर असे ज्याला जशी जागा सांप-डेल त्याप्रमाणं सर्व खेडूत स्थानापन्न झाल्यावर त्या जमावांतून मी त्यांचा पुढारी आणि आपला कथानायक शोधून काढला. हा आपला

जानपद कथानायक त्याच्या कोटामुळं तर इतरांमधून उठून दिसत होताच, पण इतरांपेक्षां तो जरा पुष्टहि होता. शिवाय त्याच्या मिशांचे झुपकेहि होते. आपला कथानायक एक अगदींच मळकट धोतर नेसला होता; त्याचं कुडतं, मुंडासं आणि कोटहि अगदींच मळकट होता. जिथं पिण्याकरितां देखील पुरेसं पाणी मिळत नाहीं अशा एखाद्या वाळ-वंटांत त्याचं वास्तव्य असावं असा त्याच्या कपड्यांवरून मीं तर्क केला.

आपल्या कोटामुळं (कारण इतरांजवळ कोट नव्हते) आणि आपल्या भरगच्च मिशांमुळं हरिणांच्या कळपांत जसा काळवीट, त्याप्रमाणं उठून दिसणाऱ्या आपल्या कथानायकाला सारी स्थिरस्थावर झाल्यावर मी प्रश्न केला, " कोण गांवची मंडळी ? "

" मडकीदामची. "

' मडकीदाम ' नांवाचं एक वाळवंट ह्या पृथ्वीच्या पाठीवर आहे, ह्या माहितीची मीं माझ्या ज्ञानकोशांत भर घातली आणि विचारलं,

" कुणाला तपासायचं आहे ? "

" ह्यें पोर आणलंय्. " आपला कथानायक म्हणाला.

" आणखी कुणाला तपासायचंय् ? " मी विचारलं.

" ह्यो योकच पॅशिजर आहे. " आपला जानपद – कथानायक म्हणाला. ' पॅशिजर ' आणि ' पेशंट ' ह्या दोन शब्दांची त्यानं गल्लत केलेली दिसत होती.

" मग हे बाकीचे लोक कशाला आलेत् ?" मीं विचारलं.

" आज बाजारचा दिवस म्हून आलीया मंडळी."

हें उत्तर ऐकून माझी निराशा झाली. ती लपवण्याकरितां मी विचारलं, " नांव काय तुमचं ?"

" काळू पाटील."

" काय होतंय् मुलाला ?" मी पुन्हां विचारलं.

"आत्ता पाहा तुम्हीच. आम्ही खेड्यावल्लीं माणसं. त्यें जर आम्हांला कळतं, तर तुमच्याकडं कशाला आणलं असतं?" येवढं बोलन काळू पाटलानं इतर मंडळीवरून आपली दृष्टि फिरवली. त्यावेळीं त्यानं आपल्या त्या भरघोस मिशांवरून हात फिरविण्याची कांहींच जरूर नव्हती; त्यामुळं त्याची ती दृष्टि विजयोन्मादाची आहे, 'कशी जिरवली ह्या लिवनाऱ्या दाक्तराची!' असा अर्थ तिच्यांत स्पष्ट आहे, असा मला निष्कारण भास झाला.

"हां हां!" सर्व खेडुतांनीं पसंतीदर्शक माना हालवून उद्गार काढला, "आम्ही खेड्यावल्लीं माणसं!"

खेड्यावल्लीं माणसं! धरतीमातेचीं तीं साधीभोळीं निष्पाप लेकरं. त्यांना आमच्या शहरी लोकांचे छक्केपंजे ठाऊक नाहींत. लबाडी ठाऊक नाहीं. उलट, त्या निष्पाप जिवांना कुणीहि हातोहात फसवावं! त्यांची तोंडंच पाहा. किती भोळे आणि अडाणी दिसतात ते. त्यांचे कपडे मळकट असले तरी त्यांचीं हृदयं पुसून काढलेल्या कांचेइतकीं स्वच्छ असतात. लहान मुलंच तीं! लहान मुलांवर कुणीं रागवतं का? मग खेड्यावरल्या माणसांवर रागावण्यांत तरी काय अर्थ आहे? काळू पाटलानं तें वाक्य उच्चारलं तें सहजच उच्चारलं असलं पाहिजे. आपलं अज्ञान दाखवण्याचाच त्याचा हेतु असावा; माझी जिरवण्याचा तर त्याचा मुळींच उद्देश नसावा. तसा कांहीं अर्थ त्या वाक्यांतून निघतो ह्याची कल्पना तरी त्या बिचाऱ्याला होती कीं नाहीं कोण जाणे!

म्हणूनच मी आपला राग गिळला आणि त्या आजारी मुलालाच विचारलं,

"ताप वगैरे येतो का रे तुला?"

"ऑं?" त्या मुलानं विचारलं.

मी पुन्हां तोच प्रश्न केला. त्याबरोबर धरतीमातेचं तें निष्पाप

अल्लड कोकरूं आपल्या कथानायकाकडे अगतिकपणानं पाहूं लागलं. ‘आतां ह्या भयंकर संकटांतून तुम्हीच मला वांचवा,’ असं जणूं तो मुलगा काळू पाटलाला विनवत होता. त्याबरोबर काळू पाटील त्याच्या सहाय्याला धांवून आला. काळू पाटील म्हणाला, “हां, कधी येतो ऽ–कधी न्हाईबी येत!”

मी विचारलं, “किती येतो ताप?”

“आता आमच्याजवळ काय डिग्री आहे?”

“पण अंदाजी?”

काळू पाटलानं आपल्या अनुयायांवरून मघाची ती विजयोन्मादाची दृष्टि फिरवण्यापूर्वीच मीं विचारलं.

“असंल कधी शंभर, तर कधी दोनशे,” काळू पाटलानं उत्तर दिलं.

जमावानं पसंतीदर्शक माना हालवल्या. काळू पाटील शब्दांत न सांपडण्याची जी काळजी घेत होता, ती पाहून त्यांना त्याचं कौतुक वाटत असलेलं त्यांच्या चेहऱ्यांवरून स्पष्ट दिसून येत होतं. उगाच नव्हता त्यांनीं काळू पाटलाला आपला पुढारी निवडला!

“भूक कशी लागते?” मीं त्या पोराला विचारलं.

“ऑं?” त्या पोरानं विचारलं.

ह्या वेळीं तो प्रश्न मी पुन्हां विचारला नाही. ‘खेड्यावल्ली माणसं’ प्रश्न विचारला कीं त्याचं उत्तर एकदम कधीं देत नाहींत; आपला अडाणी चेहरा ते आणखीनच अडाणी करतात आणि उलट आपल्यालाच प्रश्न करतात, “ऑं?” पण आतांपर्यंतच्या अनुभवावरून मला असं दिसून आलं आहे, कीं त्यांना असला प्रश्न नीट ऐकूं गेलेला असतो. त्याचा अर्थहि त्यांना नीट कळलेला असतो. पण प्रश्नाचं उत्तर देण्यापूर्वीं त्यांना नीट विचार करायचा असतो. विचार

करायला वेळ मिळावा म्हणून त्या साध्याभोळ्या जिवांची ही 'युगत' असते.

"कधीं लागते–कधी न्हाईबी लागत भूक!" काळू पाटील म्हणाला आणि त्यानं त्या मुलाची संकटांतून पुन्हां एकदां सुटका केली !

"थंडी वाजते का ताप येण्यापूर्वीं ?" —मी.

"आँ ?" —तो मुलगा.

"उगाच थोडा कांटा !" —काळू पाटील.

"वय किती तुझं ?" —त्या मुलाला मी विचारलं.

"आँ ?"—तो मुलगा.

"आतां आम्हाला काय ठावं ? आम्ही खेड्यावल्लीं माणसं !"— काळू पाटील.

"कधीं डोकं दुखतं का ?"—मी जरा टोचून.

"आँ ?"—तो पोरगा.

"कधी वाईच दुखतं—कधी न्हाईबी दुखत !"—काळू पाटील.

त्यानंतर मी आणखी पुष्कळच प्रश्न त्या पोराला विचारले. त्यानंहि 'आँ ?' अस म्हणून मला प्रश्न विचारले. आणि काळू पाटलानं आपण शब्दात पकडले जाणार नाहीं ह्याची काळजी घेत माझ्या प्रश्नांचीं उत्तरं दिली.

मग मी त्या पोराची शारीरिक तपासणी केली. त्याचं पोट चाचपून तपासलं, त्याच्या छातीला नळी लावली, त्याची नाडीहि पाहिली आणि चेहरा गंभीर करून बसलों.

"बराबर तपासा, दावतरसाहेब." इतका वेळ पार्श्वभूमींत असलेला एक 'म्हातारा' पुढं होऊन म्हणाला, "अगदीं नीट परीक्षा करा."

"नीटच तपासलं मी !"—मी.

माझं हें वाक्य ऐकतांच त्या जमावांतल्या 'जाणते' म्हणून सम-

जल्या जाणाऱ्यांनीं एकमेकांकडे पाहून नेत्रपल्लवी केली. जणूं आपल्या डोळ्यांनीं त्यांनीं माझ्यावर अविश्वासाचा ठरावच पास केला. अखेरीस तो मघाचा म्हातारा म्हणाला, "दाक्तरसाहेब, योक राहृयलं!"

"काय?" मी आश्चर्यानं विचारलं.

"पोराच्या पोटाला नळी न्हाई लावली तुम्ही!" माझं अज्ञान उजेडांत आणत तो म्हातारा म्हणाला.

"पोटाला नळी?" मीं विचारलं. "पोटाला नळी लावून काय उपयोग?"

माझा हा प्रश्न ऐकतांच त्या जमावाचा माझ्यावरचा विश्वास एकदम शून्यावर आलेला दिसला. कांहींनीं तर जणूं आपण आतां उठूनच जात आहोंत, अशी चुळबूळदेखील केली. त्यांच्या दृष्टीनं माझ्या ह्या एकाच उत्तरानं मी परीक्षेंत नापास झालों होतों!

"पण आमच्या गांवचा वैद्य तर पोटाला नळी लावून तपासतो." 'मडकीदाम आमच्या शहरापेक्षां एका बाबतींत तरी वरचढ आहे' असं दाखवणाऱ्या आवाजांत काळू पाटील म्हणाला.

"परवा खंड्याच्या मांडीला मार लागला तवा मांडीलाबी त्येनं नळी लावून तपासलं!" तो म्हातारा म्हणाला.

जमावांत एकच खळबळ माजली. आपल्या विषयाचं मूलभूत ज्ञानहि मला नाहीं, असा सर्वांनीं निर्णय घेतलेला दिसला. आतां माझ्या दवाखान्यांत एक क्षणभरदेखील थांबण्यांत अर्थ नाहीं, असं ते एक-मेकांना दबलेल्या आवाजांत सांगत होते. विषयांतर करण्याच्या उद्देशानं मी म्हणालों, "त्याला थंडीताप आहे."

माझ्या ह्या वाक्याचा त्या जमावाला कांहींच अर्थबोध झालेला दिसला नाहीं. मग काळू पाटलानं विचारलं, "थंडीताप तर हायच. पण तो ऊष्ण वात हाये की सरद वात हाये?"

" सर्दीचा वात आहे ! " मी म्हणालों.

ही वाताची, ऊष्णतेची नि सर्दीची भानगड मला अजूनपर्यंत कळलेली नाहीं. पण अशा प्रसंगीं एकंदर रागरंग पाहून मी असं कांहींतरी उत्तर ठोकून देतों. त्यामुळं बिचाऱ्या ' खेड्यावल्ल्या पॅशिजरा ' ची थोडी फसवणूक होते हें खरं; पण त्याला इलाज नाहीं. ह्या भाषेंत रोगाचं निदान केल्याशिवाय त्यांना कांहीं कळत नाही की त्यांचं समाधानहि होत नाहीं. त्यांच्या भल्याकरितांच करावं लागतं हें मला. माझं उत्तर बरोबर आहे कीं चूक आहे हें जाणण्याकरितां मी काळू पाटलाकडे पाहिलं. तो निरुत्तर झालेला दिसत होता आणि जमावाची चुळबूळहि थंड पडली होती. त्यावरून माझा खडा अचूक लागल्याचा पडताळा मला मिळाला आणि माझा आत्मविश्वास परत आला.

" त्याला सुई दिली पाहिजे; आणि आठ दिवसांचं औषध देईन. त्याच्या शरिरांतली सगळी सर्दी नाहींशी होईल. " मी पूर्ण आत्मविश्वासानं म्हणालों.

त्या साध्याभोळ्या खेडुतांना माझं म्हणणं एकदम पटलेलं दिसलं. काळू पाटील म्हणाला, " हां. भारीचं इंजंक्शन द्या. "

" एकंदर दहा रुपये पडतील. " मी मुख्य मुद्द्याला हात घातला.

" असं नगा करूं—आम्ही खेड्यावल्लीं माणसं ! " काळू पाटील म्हणाला.

" आतां औषधं महाग झाली आहेत. ह्या वॉर टाइमांत– " बोलतांना मी मधेंच थांबलों. ' खेड्यावल्ल्या ' ह्या अडाणी माणसांना हा अवघड इंग्रजी शब्द काय समजणार? असा विचार करून मी सोप्या लोकभाषेंत म्हणालों, " ही लढाई आहे ना, त्यामुळं सगळ्या औषधांच्या किंमती वाढल्या आहेत. "

" वार्टेमाचं नका सांगूं हो, " काळू पाटील म्हणाला.

" वार्टेमाचं ? म्हणजे ? " मी विचारलं.

माझ्यासारख्या शिकल्यापढलेल्या ' डागतरा ' ला एवढ्या साध्या शब्दाचा अर्थहि कळूं नये ह्याचं त्या जमावाला आश्चर्य वाटलेलं दिसलं. काळू पाटील स्पष्टीकरण करण्याकरितां म्हणाला, " वार्टेम ! जर्मलांची नि ब्रिटिशांची वार चालू आहे ना ? "

" हं हं ! " माझ्या डोक्यांत प्रकाश पडून मी म्हणालों, 'वॉरटाईम!'

" हां ! वार्टेम ! " काळू पाटील म्हणाला, " ह्या वार्टेमांत समदं-महाग झालं. आम्हांला तर खायालाबी न्हाई मिळत ! "

" तुमचं ठीक आहे हो. " मी म्हणालो, " धान्याच्या किंमती किती वाढल्यात ! चिक्कार फायदा होत असेल तुम्हांला ! "

" कायचा फायदा ! " काळू पाटील म्हणाला " औंदा पानकळ्यांत पानी झालं न्हाई म्हून बाजऱ्या आला न्हाई ! "

" पण गव्हाचं पीक तर चांगलं आलं असेल ना ? " दहाऐवजी आठ रुपये घेऊं असा विचार करून मी विचारलं.

" अहो, कसलं आलय् गहू ! हा पर्वा पानी झाला ना तं साऱ्या गव्हावर तांबेरा पडला." —काळू पाटील.

" पण आतां द्राक्षं तरी चांगलीं येतील " मनांतल्या मनांत आठाचे सहा करून मी भीतभीत विचारलं.

" दराक्ष तर परवाच्या थडानं खलास झालीं ! " तो म्हातारा म्हणाला.

आतां अशा लोकांकडे काय मागणार ? त्यांच्याकडून औषधाचे पैसे मागण्याची कल्पना मनांत आणणं म्हणजेसुद्धां मला पाप वाटूं लागलं. मी म्हणालों, " बरं तर, पांच द्या ! "

"न्हाई न्हाई! असं नगा करू साहुचेब." काकुळतीनं काळू पाटील म्हणाला, "पोराला बाप न्हाई. त्याची आई रांडकू आहे!"

"रांडकू?" मी आश्चर्यानं विचारलं. रांडेच्या मुलाला घेऊन ह्या लोकांनीं कां यावं मला कळेना!

"हां, रांडकू!" काळू पाटील म्हणाला, "इथवेला आम्ही खेडयावल्लीं माणसं रांडकू म्हणतों."

"असं, असं." माझ्या ज्ञानकोशांत मी ह्या सुंदर शब्दाची भर घातली.

'त्येला खायलाबी न्हाई. पुन पोर तापानं बेजार झालं, म्हून घेऊन आलों मी. म्हंगालों, करूं पोरासाठीं चारदोन रुपये खर्च!" काळू पाटील म्हणाला.

धरतीमातेच्या त्या सुपुत्रानं मला पुरतं लाजवलं. एका अनाथ पोरक्या मुलाला केवळ भूतदयेनं प्रेरित होऊन आणि स्वतःची पदरमोड करून औषधोपचाराकरितां तो माझ्याकडे घेऊन आला होता. मी मात्र माझ्या पेशाचा परम पवित्रपणा विसरून त्याच्याशीं पैशाची घासाघीस करीत होतों. शरमिंद्या स्वरांत मीं विचारलं, "मग म्हणणं काय तुमचं?"

"तीन रुपये घ्या. येतांना चार रुपये मारवाडयाकडून घेऊन आलों होतों." गयावया करीत काळू पाटील म्हणाला, "आठ आणं येतांना बशीला लागले, आठ आणं मला वापस जाया होवंत."

माझा आतां नाइलाज होता. मी साधारण हिशोब केला. येवढया रकमेंत औषधाची किंमत कशीबशी भरून निघत होती. 'बरं' म्हणून मी इंजेक्शनची पिचकारी उकळण्याकरितां स्टोव्हवर ठेवून पुन्हां आपल्या खुर्चीवर येऊन बसलों.

" वाईच जरा लवकर, " काळू पाटील म्हणाला, " मला कोडतांत जायचं आहे. "

त्याच्या मघाच्या बोलण्यावरून आणि ' इंजेक्शन 'च्या बदली त्यानं ' इंजंक्शन ' हा शब्द वापरला होता त्यावरून त्याला डॉक्टरापेक्षां वकिलाशींच बोलण्याचा अधिक सराव आहे हें मीं ओळखलंच होतं. मी म्हणालों, " आतां होईल पांच मिनिटांत. " मीं एक सिगरेट शिलगावली. काळू पाटलानं बिडी काढली. म्हाताऱ्यांनीं चिलमी पेटवल्या. थोड्याच वेळानं माझा दवाखाना धुरानं आणि खोकल्यानं भरून गेला.

पिचकारी तयार होईपर्यंतचा वेळ कसातरी काढावा म्हणून काळू पाटलानं तेव्हां चालू असलेल्या लढाईचा विषय काढला. ' जर्मला '-विषयीं त्या सर्वांना कौतुक आणि आदर वाटत होता. काळू पाटलानं विचारलं, " आता हिट्लर कुणावर आर्कमन करणार ? "

" आर्कमन ? " मी विचारलं. आणि तेवढ्यांत खुलासा होऊन उद्गारलों, " हं, हं, आक्रमण ! "

" हां. हिटलर आता कुनावर आकर्मन करनार ? "—काळू पाटील.

नंतर आम्ही दोघांनीं युद्धाच्या डावपेचांवर त्या पांच मिनिटांत शक्य तेवढी चर्चा केली. कुठल्याहि मुद्द्यावर काळू पाटील माझ्या विरुद्ध बाजू घेत असे व असं कांहीं बोलत असे कीं, मला त्याचा अर्थबोधच होत नसे. साहजिकच मी गोंधळून जाऊन निरुत्तर होई. सारा जमाव आमची ती चर्चा ऐकून थक्क झाला. विशेषतः काळू पाटलाचं युद्धविषयक ज्ञान पाहून, मधेंच तो वापरत असलेला एखादा जाडा शब्द ऐकून आणि ह्या येवढ्या अवघड विषयांतहि तो माझ्यासारख्या ' लिवनाऱ्या डाक्तरा 'शीं यशस्वीपणानं दोन हात करूं शकतो हें पाहून

तर त्यांना काळू पाटील म्हणजेच खुद्द हिटलर असंहि तेवढ्या वेळे-पुरतं वाटलं असणं शक्य आहे.

मुलाला इन्जेक्शन दिलं. औषधहि दिलं. औषधाला बाटलीहि मीच दिली. तीनतीनदां औषध घेण्याविषयींच्या सूचना समजावून दिल्या. त्यांच्या साऱ्या शंकाकुशंकांचं शांतपणानं निरसन केलं. पथ्याविषयीं—काय घ्यावं नि काय वर्ज्य करावं—सविस्तर चर्चा झाली. पृथ्वीतला-वरील यच्चयावत् खाण्यासारख्या व पुष्कळशा न खाण्यासारख्याहि वस्तु त्या पोराला दिल्या तर चालतील कीं नाहीं ह्याविषयी कीस काढण्यांत आला आणि अखेरीस मी अगदीं थकूनभागून गेल्यावर 'बरं आतां पैसे द्या' अशी मी काळू पाटलाला सूचना दिली.

काळू पाटलानं आपल्या कोटाच्या उजव्या खिशांत हात घातला आणि एक पावली काढली; मग डाव्या खिशांत संशोधन करून एक चौकोनी चवली काढली. मग कमरेला चाचपून उजव्या कनवटींतून एक अधेली काढली. डाव्या कनवटींतून दोन आण्यांचा खुर्दा काढला आणि तो काळजीपूर्वक चारचारदां मोजला. मग त्यानं कुडत्याच्या चोर-खिशांतून एक बंदा रुपया काढला. त्यानंतर त्यानं ती सर्व रक्कम मोजून काढली. मग आपलं मुडासं चाचपलं. त्यांतून एक गोल चवली काढली. मग त्यानं सगळीकडे तपासलं, पुन्हां पैसे मोजले आणि मग तो त्या म्हाताऱ्याला म्हणाला, "पिराजी पाटील, थोडं पैसं देतां का? तीन रुपयांना चौदा आणं कमी पडत्यात!"

पिराजी पाटलानं आपले खिसे उलटे केले. त्यांतून एक चकमक, एक चिलीम, थोडीशी तंबाखू आणि त्याच्या सदऱ्यावरून तुरुतुरु चालत जाणारा कुठलासा एक छोटा प्राणी ह्यांखेरीज दुसरं कांहीं निघालं नाहीं.

"मला उशीर होतोय्!" मी म्हणालों, शरिराच्या कुठल्याहि भागां-

तून काळू पाटील एखाद्या जादुगाराप्रमाणं पैसे काढील अशी मला खात्री होती.

" घेतों, घेतों ! " असं म्हणून काळू पाटलानं कंबरेचा कसा काढला आणि त्यांतून कांहीं पैसे काढून ते त्यानं आधीं काढलेल्या पैशांत मिळविले. मग ते पुन्हां एकदां मोजून माझ्या टेबलावर ठेवून देत तो म्हणाला, " घ्या तुमचं पैसं. "

तो पैसे काढत असतांना माझ्या मनांत विचार आला—काय हें खेड्यांतलं दारिद्र्य ! तीन रुपयांची जमवाजमव करतांना केवढा हा त्रास ! आणि तेहि मारवाड्याकडून कर्ज काढून आणलेले. ते तीन रुपये मी घेणार ह्याचा अर्थ काळू पाटलाला निदान आठ दिवस तरी अर्धपोटीं राहावं लागणार असाच नाहीं का ?

पथ्याविषयीं आणि औषध केव्हां घ्यावं, कसं घ्यावं, ह्यावर पुन्हां थोडी चर्चा झाल्यावर मंडळी ' रामराम ' करून निघून गेली.

ते निघून गेल्यावर एका मुलाला औषधोपचार करण्याच्या सत्कार्यांत आपलाहि हातभार लागला ह्या विचारानं मला सात्त्विक आनंदाचा लाभ झाला. त्याचा पुरा उपभोग घेण्याकरितां ' हुश्श ' करून मीं एक सिगारेट शिलगावली.....

सिगरेट ओढून झाल्यावर टेबलावर पडलेला तो तीन रुपयांचा खुर्दा मी उचलला. त्यांतला रुपया मला जरा काळसर दिसला म्हणून मी तो वाजवून पाहिला. त्याचा बद्द आवाज झाला. चवली चोपडी होती; अधेलीला खोच गेलेली होती.

काय ही फसवणूक ! माझ्या मनांत सात्त्विक संताप उत्पन्न झाला. धरतीमातेच्या ह्या साध्याभोळ्या लेकरांच्या अज्ञानाचा फायदा लोक दुष्टपणानं घेत असले पाहिजेत! त्यांना किती फसवत असले पाहिजेत! साध्या तीन रुपयांत दोन रुपये बारा आणे खोटे—आणि चार आणे

तर अजिबातच कमी! छे छे, शेठजी आणि भटजी ह्यांनीं शेतकऱ्यांची शतकानुशतकं जी ही दुष्ट पिळवणूक चालवली आहे ती बंद पाडलीच पाहिजे. खेडुतांना सज्ञान करणं, त्यांना साक्षर करणं आणि शहाणे करून सोडणं, हाच एक उपाय त्यांची स्थिति सुधारण्याकरितां राहिला आहे!... मी तो खुर्दा खिशांत घातला व घरीं जाण्याकरितां म्हणून उठलों.

एवढ्यात माझ्यासमोर आणखी एक खेडूत उभा असलेला मला दिसला. प्रथम वाटलं, मघां मडकीदामच्या ज्या सैन्यानं माझ्या दवाखान्यांत तळ ठोकला होता, त्यांतलाच हा एखादा पाठीमागं पडलेला सैनिक असावा! पण माझा तो तर्क चुकीचा ठरला. कारण, तो मडकीदामनिवासी दरवाजांतून बाहेर जात नव्हता, तर आत येत होता.

"मडकीदामची मंडळी आली व्हती का!" त्यानं विचारलं.

"हो. येऊन गेली आत्ताच." मी म्हणालों.

"काळू पाटलाच्या पोराला दवादारू दिली?" त्यान विचारलं.

"दिली." मी म्हणालों. मग मी एकदम विचारलं, "कुणाला?"

"काळू पाटलाच्या पोराला. लई मोठी असामी आहे काळू पाटील म्हंजे. लाखाचा दावा चाललाय् कोडतात त्याचा."

"काळू पाटलाचा पोर? तें पोर तर राडकूचं आहे ना?"

"न्हाई न्हाई! काळू पाटलाला चांगलं त्याच्या आवेपासनं झालंय्."

"पण ते तर म्हणाले कीं त्या पोराला बाप नाहीं म्हणून! आणि त्याच्या औषधाकरितां त्यांनीं मारवाड्याकडून चार रुपये उसने आणलेत!"

"पैसे उसने घ्यायची त्येंना काय जरूर?"

"पण ते तसं म्हणाले ना!"

"आँ?...असं म्हंगाले ते?" तो खेडूत म्हणाला.

"हो!" मी ठासून म्हणालों.

"आम्ही खेड्यावल्लीं मानसं–आम्हांला काय ठावं!" तो खेडूत म्हणाला आणि तो अडाणी, हरघडीला ह्या लबाड जगाकडून फसविला जाणारा साधाभोळा जीव मठ्ठ चेहरा करून, रखरखीत उन्हांतून मडकीदामची वाट चालूं लागला.

---

# ३. हिरा

देवळालीच्या मिलिटरी अकौंट्समध्यें आठ तास खर्डेघाशी केल्यावर, जुन्या नाशकांतील आडमुठ्यांच्या वाड्याकडे जाणारी चढण आपल्या थकल्या भागल्या गात्रांनीं जर बगोबा कुठल्या आशेच्या जोरावर चढत असतील, तर तें म्हणजे छबूताईंच्या हातचा झकास चहाचा एक कप मिळण्याच्या आशेवरच. बाकी छबूताई कशाहि असोत, त्यांच्या हातच्या चहाला कांहीं निराळीच लज्जत असे, एवढं बगोबांना खासच कबूल करावं लागे. त्या चहापुढं नाशकांतील प्रसिद्ध भगवंतरावांच्या हॉटेलां-तील चहादेखील त्यांना फिक्का वाटे. दमूनभागून ते घरीं आले, आणि वळकटीला टेकून बसले कीं, एखाद्या यंत्राच्या नियमितपणानं, ज्याच्या-वर जाडजाड वाफांचीं वलयं फिरत आहेत, असा एक चहाचा गरमा-गरम कप त्यांच्या पुढ्यांत आणून ठेवला जाई. आणि मग त्यांवर हलकेंच फुंकर घालीत, गळा शेकीत जाणाऱ्या चहाचे घुटके घेतांघेतां बगोबा साऱ्या जगाला विसरून जात.

पण आज बगोबा ऑफिसांतून घरीं आले, वळकटीला टेकून बसण्या-लाहि त्यांना कितीतरी वेळ झाला, पण नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें त्यांचा चहा कांहीं आला नाहीं.

आपली नेहमींची खंडणी अजून कशी आली नाहीं, म्हणून त्यांच्या पोटोबानं एकच गिल्ला सुरू केला. एकदोनदां त्यांनीं स्वयंपाकघरांतील अंधारांत डोकावून पाहिलं. नंतर उगाचच छबूताईसमोरून एकदोन

चकरा मारल्या. पण तरीहि कपबशांच्या खळखळाटाचं मधुर संगीत त्यांच्या कानांवर पडलं नाहीं. तेव्हां त्यांनीं स्वयंपाकघराच्या दरवाज्याला उद्देशून म्हटलं, "आम्हीं आलोंय् म्हटलं !"

"दिसतं मला. माझे डोळे कांहीं अजून फुटले नाहींत !" आंतून उत्तर आलं.

"चहा मिळेल का आम्हांला? चहावांचून जीव तडफडतोय् आल्या-पासनं !"

"मग तडफडूं द्या त्याला !"

"म्हणजे ?"

"दूध नाहीं चहाला."

"कां ? गवळ्यानं आणलं नाहीं कीं काय ?"

"गवळी कशाला नाहीं आणणार ? महिन्याच्या पहिल्या तारखेला त्याच्या नाकावर दिडक्या टिचवतें, तो बरा आणल्याशिवाय राहील !"

"मग ? काय झालं दुधाला ? नासलं कीं काय ?"

"ऊं हूं !"

"मग काय सांडलं ?"

"हो, बारा आणे शेराचं दूध सांडायला हजार रुपये पगार आणून देतां कीं नाहीं तुम्ही !"

"अहो, मग झालं तरी काय दूध ? नासलं नाहीं, सांडलं नाहीं, मग....."

"मी पिऊन टाकलं ! असंच ना ? मग म्हणा ना तसं स्पष्ट ! असं चोरून दूध पिऊन पिऊन तर मी ही अशी एवढी लठ्ठ झालेंय् !"

इतक्यांत स्वयंपाकखोलीच्या त्या अंधारांतून कुठूनसा 'म्याव्' असा किंचित्सा आर्त स्वर आला. क्षण दोन क्षणांतच बगोबांच्या पायांना

कसला तरी मऊमऊ स्पर्श झाला, व त्या दिशेनें 'गुर्रर' असा आवाज त्यांच्या कानांवर येऊं लागला.

तें मांजराचं काळंकुट्ट पिल्लूं बगोबांनीं प्रेमानं उचलून घेतलं, नि ते त्याची मान खाजवूं लागले.

इतक्यांत स्वयंपाकखोलीच्या एका कोंपऱ्यांत कांहीं तरी खुडबुड झाली, आणि त्याच्या पाठोपाठ पत्र्याचे डबे जमिनीवर आदळल्याचा आवाज झाला.

"काय बाई उंदरांचा त्रास तरी! अगदीं पिसाळून सोडलंय् मेल्यांनीं!" छबूताई उद्गारल्या.

"हो, पण आतां थोडेच दिवस राहृयलेत त्यांचे. आपली हिरा एकदां मोठी झाली कीं औषधालासुद्धां घरांत उंदीर सांपडणार नाहीं." हे शब्द बगोबानीं मोठ्या उत्साहांत उच्चारले खरे, पण नंतर मात्र त्यांना जरा वाईट वाटलं. इतके दिवस उंदीर त्यांच्या घरांत अगदीं पाळल्याइतके निःशंकपणानं फिरत असत. जणूं कांहीं आपणहि बगोबाच्या कुटुंबाचे घटकच आहोंत, व आपल्या पालनपोषणाची नैतिक जबाबदारी बगोबांनींच आपल्या शिरावर घेतलेली आहे, अशी आपली समजूत असल्याप्रमाणं त्यांची वागणूक होती. त्यांची ही समजूत चुकीची आहे, असं त्यांना दाखविण्यासारखं कोणतंहि कृत्य बगोबांनींहि अजूनपर्यंत केलेलं नव्हतं म्हणून त्यांना आतां हे शब्द उच्चारल्यावर वाईट वाटलं. आपणांवर आंधळेपणानं विश्वास टाकून राहिलेल्या ह्या उंदरांचा, हिराला घरीं आणून आपण केसानं गळा कापणार आहोंत, असंच त्यांना वाटलं.

"उंदीर खाईल तेव्हां खाईल तुमची हिरा!" छबूताई खेंकसल्या, "सध्यां तरी दुधावरच ताव मारतंय् तुमचं रत्न!"

बगोबा निरुत्तर झाले. चहांतून आपल्या पोटांत जाणारं दूध हिराच्या

काळचाकुट्ट पोटांत आहे, हें त्यांस कळून चुकलं. चहाची तलफ तशीच दाबून टाकण्याचा प्रयत्न करीत, ते पुन्हां वळकटीशीं टेकून बसले.

हिराला त्यांनीं पंधराएक दिवसांपूर्वीं घरीं आणल्यापासून हें असंच चाललं होतं. हिराला आणलं, आणि तेव्हांपासून युद्धदेवताहि त्यांनीं घरीं आणली. तिला आणल्यापासून त्यांच्या घरांतील शांति समूळ नष्ट झाली होती. ज्या दिवशीं त्यांनीं हिराला घरीं आणलं होतं, त्या वेळच्या आपल्या मनाच्या कमकुवतपणावर ते चरफडत बसले.

"हा पहा तुमचा शत्रु ! त्यानें तुम्हांला ठार करण्यापूर्वी तुम्ही त्याचा नायनाट करा !"

भल्या मोठ्या लाल अक्षरांत छापलेल्या ह्या जाहिराती बगोबांनीं त्या दिवशीं दुकानादुकानांवर डकवलेल्या पाहिल्या, आणि आणखी एका नव्या युद्धाची ही घोषणा पाहून त्यांना आनंदहि झाला. हिटलर, टोजो, मुसोलिनी ह्या दुष्ट त्रयीचा नायनाट झाल्यापासून आपली युद्धकालीन हंगामी नोकरी सुटते कीं काय, ह्या चिंतेंत ते अलीकडे होते. तिची मुदत आतां ह्या युद्धामुळें आणखी कांही काल वाढली, ह्या विचारानं त्यांना समाधान वाटलं.

पण हा नवा शत्रु कोण, ह्याविषयीं त्या जाहिरातींतून कांहींच स्पष्ट उल्लेख नव्हता. फक्त त्या शत्रूचं प्रतीकच त्या जाहिरातीवर चितारण्यांत आलं होतं. हिटलर–मुसोलिनी–टोजोरूपी राक्षसांतला दत्तात्रय, हातांत तलवार उगारून दांत विचकणारा नकटा चष्मेवाला जपानी, वगैरे चित्रं आतांपर्यंत बगोबांच्या चांगल्याच परिचयाचीं झालीं होतीं. पण आजच्या जाहिरातींतील चित्राचा त्यांना कांहींच अर्थबोध होईना.

नव्या युद्धाच्या घोषणेची ही 'सनसनाटी भरेली' बातमी गंगूनानांच्या कानांवर घालून ह्या युद्धाविषयीं शक्य तेवढी माहिती त्यांच्या कडून मिळविण्यास बगोबा अधीर झाले. गंगूनानांची एक युद्धशास्त्र-

विशारद म्हणून नुकत्याच संपलेल्या महायुद्धांत बरीच कीर्ति झाली होती. म्हणजे त्यांनीं कुठं रणांगणावर जाऊन तलवार गाजवली होती अशांतला मुळींच भाग नव्हता. पण घरच्या घरींच बसून वर्तमानपत्र, रेडिओ आणि नकाशे ह्यांच्या सहाय्यानं त्यांनीं हें युद्ध गाजवलं होतं; इकडचीं सैन्यें तिकडे केलीं होतीं, सप्तमहासागरांतून मोठमोठालीं आरमारं फिरवलीं होतीं, नी विमानांच्या काफल्यांना साऱ्या जगभर हैदोस घालावयास लावला होता. इतकं कीं आपल्या ह्या युद्धकलेंतील ज्ञानाच्या जोरावर त्यांनीं आपल्या मित्रमंडळीला कांहीं दिवस सळो की पळो करून सोडलं होतं. 'गंगूनाना जर जर्मनींत जन्माला येते, तर जर्मन हायकमांडमधली एक खुर्ची फील्डमार्शल फॉनं गंगूनानांकरतां अगदी रिझर्व केलेली होती!' असा प्रवाद नाशकांत अजूनहि ऐकूं येत होता. अर्थात् ह्या नव्या युद्धाविषयीची साद्यंत माहिती त्यांच्याकडून मिळविण्याची बगोबांना उत्सुकता वाटल्यास त्यांत कांहींच नवल नव्हतें.

"काय गंगूनाना, नवीन युद्धाची घोषणा झाली म्हणे?" गंगूनानांकडे गेल्यावर बगोबांनीं विचारलं.

"झाली का? वाटलंच होतं मला!" ह्या बातमीनं आनंदून चकाकत्या डोळ्यांनीं गंगूनाना म्हणाले, "आंतरराष्ट्रीय परिस्थिति इतकी गुंतागुंतीची झाली होती कीं भांडवलशाही राष्ट्रं व समाजसत्तावादी राष्ट्रं ह्यांमध्यें युद्ध होणं अगदीं अपरिहार्य आहे, असा निष्कर्ष मी कधींच काढला होता. शिवाय जागतिक प्रभुत्वाकरितां तिघां बड्या राष्ट्रांत...."

पण त्यांच्या परराष्ट्रीय राजकारणाचा ओघ तिथंच थांबवून बगोबांनीं मूलगामी पृच्छा केली, "म्हणजे इंग्लंड-अमेरिका एका बाजूला व रशिया एका बाजूला, असं युद्ध सुरू झालंय असा तुमच्या बोलण्याचा अर्थ दिसतोय्!"

" अर्थात् ! " गंगूनाना ठासून म्हणाले.

" म्हणजे ब्रिटिश सिंहाशीं रशियन अस्वलाची झुंज सुरू झाली आहे, असंच कीं नाहीं ? " बगोबा.

" निराळ्या शब्दांत तुम्ही तोच अर्थ व्यक्त केलाय्." गंगूनाना.

" मग तुमचा तर्क चुकीचा आहे. ब्रिटिश सिंहाचं हें युद्ध रशियन अस्वलाशीं नसून उंदराशीं आहे ! " बगोबा शांतपणानं म्हणाले.

" उंदराशीं ! " गंगूनानांनीं आश्चर्यानं आच वासला.

" हो, उंदराशीं म्हणजे उंदीर हें ज्या राष्ट्राचं प्रतीक आहे त्या राष्ट्राशीं ब्रिटिशांचा सिंह, जर्मनीचा गरूड, ऑस्ट्रेलियाच कांगारू, रशियाचं अस्वल, तसं उंदीर हें कुठल्या राष्ट्राचं बोधचिन्ह आहे ? मला वाटतं तें एखाद्या फडतुस बाल्कन राष्ट्राचं असेल नाहीं तर जावाचं असेल."

" उंदीर ! " गंगूनाना डोकं खाजवीत उद्गारले. त्यांनी आठवण्याचा खूप प्रयत्न केला, पण उंदीर हें कुठल्या राष्ट्राचं बोधचिन्ह आहे हें त्यांच्या लक्षांत येईना. शिवाजीला मोंगल लोक ' पहाडका चुव्वा ' म्हणत, एवढाच आतांपर्यंतच्या युद्धकारणांत उंदराचा संबंध आलेला त्यांना ठाऊक होता ! पण मग त्यांच्या डोक्याच्या कवटीतील स्विच एकदम दाबला गेला आणि त्यांच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. मोठमोठ्यानं हंसून ते म्हणाले, " वा ! खूप केलीत बगोबा ! – आणि म्हणे माझा तर्क चुकलाय् ! अहो, उंदीर हें कांही एखाद्या राष्ट्राचं प्रतीक म्हणून योजलेलं नाहीं. सध्यां नाशिकच्या आसपास ग्रंथिज्वराची सांथ सुरू झाली आहे ना, त्याची जाहिरात आहे ती ! "

" ग्रंथिज्वर ! " बगोबा उद्गारले. हें भयंकर नांव ऐकून त्यांच्या अंगावर कांटाच उभा राहिला, " हा आणखी कुठला रोग ? "

" ह्या ज्वरानं पछाडलेल्या रोग्याच्या शरिरांतील ग्रंथि किंवा गांठी सुजतात." गंगूनानांनीं ताबडतोब स्पष्टीकरण केलं.

" म्हणजे प्लेगसारखंच कांहींसं म्हणाना ? " बगोबा.

" अहो, प्लेगसारखं काय ! ग्रंथिज्वर म्हणजेच प्लेग !"

ग्रंथिज्वर म्हणजे कुठला एखादा नवा भयंकर रोग नसून, आपल्या ओळखीचा जुना प्लेगच आहे, हें कळल्यावर बगोबांना त्यांतल्या त्यांत जरा वरं वाटलं. हो कुणीसं म्हटल्याप्रमाणं अनोळखी सैतानापेक्षां ओळखीचा सैतान बरा. त्यांनीं प्रश्न केला, " बरं, मग आतां इलाज काय ? "

" बर विचारलंत ! सांगणारच होतों मी सारं ! " खुर्चीत ठाकठीक बसतां बसतां गंगूनाना म्हणाले. त्यांचा तो पवित्रा पाहून बगोबांच्या छातींत धडकीच भरली. गंगूनानांना कुठल्याहि विषयाच इतक शास्त्रशुद्ध आणि सखोल ज्ञान असे, आणि दुसऱ्याला त्या ज्ञानाचे घुटके पाजण्यांत गंगूनानाहि इतके तत्पर असत कीं, त्यांनीं अशी कांहीं प्रस्तावना केली कीं, इथून एकदम धूम ठोकावी ह्याच विचार ऐकणाऱ्याच्या मनांत प्रथम उद्‌भवे. पण आगामी संकटाच्या धास्तीनं तो इतका गलितगात्र झालेला असे, की बिचाऱ्याला जागेवरून हलण्याचं देखील त्राण उरलेलं नसे. मग तो कसाबसा ' पाणी ' एवढा एकच शब्द उच्चारी, आणि ' आलीया भोगासी असावें सादर ' असें म्हणणाऱ्या तुकोबांच्या विरक्तीनं गंगूनानांचं प्रवचन ऐकत राही. आतांहि पाण्याचे घुटके घेतां घेतां बगोबांच्या कर्णरंध्रांत ज्ञानामृताचा धबधबा पडू लागला.

" ग्रंथिज्वर अर्थात् प्लेग ही एक जंतुजन्य व्याधि आहे. माणसाच्या शरीरांत ही व्याधि निर्माण करण्यास जो जंतु कारणीभूत होतो त्याचं नांव ' पॅस्चुरिला पेस्टीस ' असं आहे. ह्या जंतूची सर्वसाधारण लांबी

१ ते २ 'म्यु' असते, व रुंदी पंचदशांश किंवा अर्धा ते एक 'म्यु' असते. साल्टएगारवर ह्याची वाढ चांगली होते...ग्रंथिज्वराच्या साथींत हे जंतू प्रथम रॅट्टस रॅट्टस जातीच्या उंदरावर हल्ला चढवितात, व एकदां ह्या उंदरांची फळी फोडली, कीं मग ते माणसांवर हल्ला चढवितात. हे पॅस्चुरिला पेस्टीस ज्या पिसवांच्या पोटांतून प्रवास करतात त्या पिसवा 'झिनॉप्सिल्ला चिऑपिस' ह्या नांवानं ओळखल्या जातात. अलंकारिक भाषेंत सांगायचं झालं तर, ह्या 'झिनॉप्सिल्ला चिऑपिस' जातीच्या पिसवांना प्लेगचीं बॉंबफेकीं विमानं म्हणतां येईल. आणि हीच उपमा पुढं चालू ठेवून, अशा शेंकडों झिनॉप्सिल्ला चिऑपिसना आपल्या शरिरांवर घेऊन फिरणाऱ्या रॅट्टस रॅट्टसना विमानवाहू गलबतं समजण्यास हरकत नाहीं.... प्लेगपासून संरक्षण व्हावं म्हणून आपणांस तिहेरी आघाडी उघडली पाहिजे. प्रथमतः प्रत्येक नागरिकानें प्लेगप्रतिबंधक लस टोंचून घेऊन, आपल्या अंतस्थ आघाडीवरील पंचमस्तंभियांचा नायनाट करण्याची खबरदारी घेतली पाहिजे. दुसरी आघाडी हीं जीं रॅट्टस रॅट्टस विमानवाहू गलबतं आहेत, त्यांच्याविरुद्ध उघडली पाहिजे, व आपल्या सभोंवतालच्या प्रांतांतून त्यांचें उच्चाटन केलं पाहिजे, – साध्या शब्दांत, उंदरांचा नाश केला पाहिजे ...तिसरी आघाडी ह्या बॉंबफेक्या विमानांविरुद्ध–झिनॉप्सिल्ला चिऑपिसविरुद्ध उघडली पाहिजे... उंदीर नाहीसे करण्याचे मार्ग तीन आहेत. विषारी गोळ्या, पिंजरे व मांजर. ह्या तिन्ही प्रकारांचा गुणावगुणावर प्रयोग करून लष्करी तज्ज्ञांनीं असा निष्कर्ष काढला आहे कीं, उंदरांचा नाश करण्याच्या बाबतींत सर्वांत सोपा, स्वस्त नी खात्रीशीर असा उपाय म्हणजे मांजरच होय. येथें आपल्या पुराणांतील एक दाखला घेणें मनोरंजक होईल. त्या काळच्या युद्धामध्यें एका पक्षानं अग्न्यस्त्र सोडलं कीं दुसरा पक्ष पर्जन्यास्त्र सोडी! एकानं सर्पास्त्र सोडलं कीं दुसरा गरुडास्त्र सोडी. ह्यावरून आपण धडा घेऊन प्लेगनं

मूषकास्त्र सोडलं की आपणहि मार्जारास्त्र सोडलं पाहिजे...ब्यूबॉनिक, न्यूमॉनिक व सेप्टिसिमिक असे प्लेगचे तीन प्रकार आहेत.."

गंगूनानांचं हें पांडित्यपूर्ण व्याख्यान ऐकतां ऐकतां बगोबा बेशुद्ध होण्याची वेळ आली होती. त्यांना त्यांतला अर्थ कितपत कळत होता कुणास ठाऊक. पण प्लेगवरील व्याख्यान जर इतकं भयंकर असूं शकतं, तर खुद्द प्लेग हा किती भयंकर रोग असूं शकेल, ह्या विषयींची यथार्थ कल्पना त्यांच्या मनांत उत्पन्न करण्यांत गंगूनानांचं तें वक्तृत्व यशस्वी झालं होतं. सुन्न मनानं बगोबा तसेच आणखी कितीतरी वेळ बसून राहिले असते. पण आपल्या मांडीवर कांहीं तरी वळवळतं आहे, हें लक्षांत येऊन ते एकदम भानावर आले. त्यांनी दचकून पाहिलं तर एक लहानसा काळा कुळकुळीत जीव त्याच्या धोतरांत उबदार जागा शोधीत असलेला त्यांच्या दृष्टीस पडला !

"हें हो काय ?" तो जीव बोटांच्या चिमटीनं उचलून टेबलावर ठेवीत बगोबांनी विचारलं.

"ती माझ्याकडून तुम्हांला भेट आहे." गंगूनाना कर्णाच्या रुबाबांत म्हणाले, "साधारण तीन वारांपूर्वी आमची मनीमांजरी व्याली, त्यांतलें हें शेवटचें पिल्लूं आहे. बरं झाल, तुम्हीं अगदीं ऐन वेळीं आलांत म्हणून; नाहींतर दुसऱ्या कुणाला तरी हें मिळालं असतं ! प्लेगवर अगदीं रामबाण !"

बगोबांना जरी माजरं आवडत असली, तरी त्यांनीं घरांत अजून एकहि मांजर पाळलं नव्हतं. आणि ह्याचं कारण म्हणजे छबूताईंना मांजरांचा अत्यंत तिटकारा होता. गंगूनानांच्या मनीनं आतापर्यंत बगोबांना खूपच त्रास दिला होता. वर्षांतून तीनचार वेळां मांजरांच्या लोकसंख्येंत तीनतीन चारचार काळ्या कुळकुळीत मांजरांची भर घालणें, व मांजरांमधल्या शिरगणती अधिकाऱ्याचं काम वाढवणें,

ह्याखेरीज तिला दुसरा कांहीं उद्योगच नसावा, अशी बगोबांची ठाम समजूत झालेली होती. कारण तिनं आपलं मातृत्वाचं कर्तव्य पार पाडलं कीं, गडकऱ्यांच्या इन्दू बिन्दूसारख्या दिसणाऱ्या तिच्या पिलाना 'स्थळं' पाहणं, हा एक गंगूनानांचा प्रमुख उद्योग होऊन बसे. त्यांच्या स्थळाच्या यादींत बगोबांचंहि नांव प्रामुख्यानं असल्यामुळं तो त्रास बगोबांनाहि वर्षांतून तीनचार वेळां न चुकतां भोगावा लागे. छबूताईंच्या भीतीनं आतांपर्यंत तरी त्यांनीं गंगूनानांना दाद दिलेली नव्हती. आतांहि त्यांनीं घाईघाईनं आपली नेहमींची सबब नंबर एक पुढं केली, "पण नकोच तें. हिला मांजराचा फारच तिटकारा आहे."

"मांजरांचा तिटकारा! असू द्या. पण त्याला आतां इलाज नाहीं! गांवांत प्लेग येऊं पाहत आहे, आणि त्याच्या प्रतिकारार्थ शहाण्या माणसानं मांजर बाळगलंच पाहिजे—नव्हे, तें त्याचं एक सामाजिक कर्तव्यच ठरतं! शिवाय हें मांजर अस्सल इराणी आहे!..."

बरेच दिवस पडून राहिलेला माल गिऱ्हाइकाच्या गळयांत बांधू पाहणाऱ्या दुकानदाराच्या चिकाटीनं गंगूनानांनीं बगोबांवर हल्ला चढवला. नागरिकांची सामाजिक व वैयक्तिक कर्तव्यं, प्लेगचा भयंकरपणा, मांजरांचे सद्गुण, वगैरे मुद्द्यांच्या जोरावर बगोबांच्या साऱ्या सबबी त्यांनीं सप्रमाण खोडून काढल्या. आणि बगोबा घरीं जावयास उठले, तेव्हां एका पिशवीत तें पिल्लू घालून, त्यांनीं ती पिशवी बगोबांच्या हातांत दिलीच.

फारसा प्रतिकार न करतां बगोबा ती पिशवी घेऊन चालू लागले खरे, पण ते केवळ गंगूनानाच्या वक्तृत्वाच्या प्रभावानं नव्हे. छबूताईंच्या मनाविरुद्ध एखादी गोष्ट करण्यास त्यांना प्रवृत्त करण्याकरतां, गंगूनानांचीच काय, पण डॉ. जयकरांची वक्तृत्वशक्ति देखील अपुरी पडली असती. ग्रंथिज्वर, झिनॉप्सिल्ला चिऑपिस, पॅस्चुरिला पेप्टीस, पंच-

दंशाश म्यू, बाँबफेकी विमानं, रॅट्टस रॅट्टस वगैरे शब्दांनीं त्यांच्या जीवाचा थरकांप उडविला होता, हें खरं. त्याचप्रमाणं मांजरं त्यांना आवडत असत हेंहि खरं, परंतु छबूताईंविरुद्ध उघडउघड बंड पुकारण्यास बगोबा केवळ एवढयाचमुळं तयार झाले नसते. त्याला तसंच आणखीहि एक महत्त्वाचं भौगोलिक कारण होतं.

गोदामाईच्या पवित्र तटाकीं वसलेलं श्रीक्षे नाशिक हें एक पुण्य-क्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. तसंच नाशिक हें एक थंड हवेचं ठिकाण म्हणूनहि प्रसिद्ध आहे. त्यामुळं दर उन्हाळयांत इथं पाव्हण्यांचा सुळ-सुळाट होतो. रक्ताचे लागेबांधे असलेल्या नातेवाइकांपासून, तों रक्त-शोषण करणाऱ्या ढेकणांपर्यंत ह्या पाव्हण्यांत सर्वांचा समावेश होतो. त्यांतत्र 'वसंत व्याख्यानमाले'च्या निमित्तानं मोठमोठे विद्वान् नाशिक'स पायधूळ झाडून जातात. देवी, गोंवर, डांग्याखोकला, वगैरे पाहुणेहि घरोघर मुक्काम ठोकून राहतात. तरीपण, दर उन्हाळयांत अगदीं नियमितपणानें येणारा सर्वांत बडा पाहुणा जर कुठला असेल, तर तो म्हणजे कॉलरा!

नाशिक हें पुण्यक्षेत्र असल्यामुळं, येथें यात्रेकरूंचीहि नेहमीं गर्दी असते. 'अन्य क्षेत्रे कृतं पापं' धुऊन काढण्याकरितां भरतखंडाच्या कानाकोपऱ्यांतून पापभीरु लोक ह्या पुण्यक्षेत्रीं गर्दी करतात. आणि येथील गंगेंत आपलीं पापं धुऊन टाकून चालते होतात. अन् मग त्या पापांचे परिणाम निस्तरावे लागतात, ते मात्र आम्हां नाशिककरांना! पुण्याच्या मागं लागलेले हे यात्रेकरू इतकीं पापं इथं ठेवून जातात कीं साक्षात् प्रभु रामचंद्राच्या बारा वर्षांच्या वास्तव्यानं पवित्र झालेली एवढी गोदामाई, पण तीदेखील अमंगळ होते, आणि मग कॉलरा इथं ठाण मांडून बसतो. जसा हा कॉलरा थंड हवेचा भोक्ता

आहे, तसाच तो वृत्तीनं धार्मिकहि असावा. कारण सिंहस्थासारखी एखादी पर्वणी आली, की त्यानंहि आपला इथला मुक्काम लांबवलाच!

अशा ह्या नाशकाच्या जुन्या वस्तींत आडमुठ्यांचा वाडा आहे. ह्या वाड्याच्या बांधणीचा काल शोधून काढणं हें काम भारत–इतिहाससंशोधक–मंडळाचं नसून, पुराणवस्तुसंशोधन खात्याचं आहे. हा वाडा नी त्यच्या समोरचा वाडा, ह्यांच्या मधून जी एक अरुंदशी मोकळी पट्टी गेलेली आहे, तिच्यावरील स्वामित्वाकरितां 'रस्ता' व 'गटार' ह्या दोन शब्दांचा पुरातन कालापासून झगडा चाललेला आहे. पण सध्यां तरी माणसं व मोऱ्यांतील सांडपाणी हे दोन्हीहि ह्या पट्टीचा गोडीगुलाबीनं उपयोग करतांना दिसून येतात. आड-मुठ्यांच्या वाड्याच्या दोहों बाजूस त्याचेच तिळे शोभतील असे दोन वाडे आहेत, व त्यांच्यामध्यें चारचार फूट जाडीच्या भिंती आहेत. पिछाडीस बखळ आहे. ह्या जुनाट भिंतींतून व बखळीं-तून 'झिनॉप्सिल्ला चिऑपिस' नामक बॉंबफेक्या विमानांना वाहून नेणारीं विमानवाहू गलबतं, म्हणजे रॅट्टस रॅट्टस उंदीर आणि घुशी, ह्यांचा सुळसुळाट आहे. वाड्याच्या महाद्वारांतून आंत प्रवेश करतांच, पडवींत बांधलेल्या गायींच्या पवित्र दर्शनानं डोळे पुनीत होतात. शेणानं नि कुजलेल्या चाऱ्यानं इथं घाण सुटलेली असली, तरी गोमूत्राच्या सिंचनानं हा प्रदेश नेहमींच पवित्र असतो. ह्यापुढं एक चौक लागतो. चौकांत नळ असल्यामुळं, वाड्यांतील साऱ्या बिऱ्हाडकरूंचीं धुणीं-भांडीं तिथंच होतात. अर्थात् तिथं तिन्ही त्रिकाळ ओल व खरकटीं हीं असतात. आंतील बाजूस अनंत अंधेऱ्या खोल्यांची मालिका आहे. ह्यापैकीं चार चिचोळ्या खोल्यांच्या एका बिळांत श्री. बगोबांनीं सौ. छबूताईंसह गेल्या दोन वर्षांपासून महिना दीड रुपया भाड्यानं आपला संसार थाटलेला होता.

ह्या आडमुठ्यांच्या वाड्यांत माणसांबरोबरच माशा, मच्छर व उंदीर हेहि कायमचे रहिवासी असल्यामुळं, येथील बिऱ्हाडकरूंना स्वर्ग अगदीं अक्षरश: दीडबोट उरलेला असे. मर्त्यलोक व परलोक ह्यांच्या-मधला तो सीमाप्रांतच होता म्हणाना. आडमुठ्यांच्या वाड्यांत किंवा त्याच्या आसपास राहणारा इहलोकचा रहिवासी परलोकांत केव्हां पटकन् पदार्पण करील, ह्याचा कांहींच नेम नव्हता. सकाळीं ऑफिसांत जातांना चांगल्या धडधाकट दिसणाऱ्या कुणा गरजू शेजाऱ्याला बगोबां-नीं थोडे पैसे हातउसने द्यावेत, पण संध्याकाळी घरी येऊन पहावं, तर त्यांचं कर्ज बुडवून त्यांच्या त्या शेजाऱ्यानं परलोकांत पोबारा केलेला असावा, अशी अद्दल बगोबांना त्या आडमुठ्यांच्या वाड्यांत नुकत्याच येऊन गेलेल्या कॉलऱ्याच्या दिवसांत चारपांचदा घडलेली होती, व तेव्हांपासून कुणाहि शेजाऱ्याला पैसे उसने देण्याचें त्यांनीं बंद केलं होतं. सांगण्याचा इत्यर्थ इतकाच की, नाशकांत कुठलाहि रोग आला, की तो आपली मध्यवर्ति कचेरी जणु काय आडमुठ्यांच्या वाड्यांतच उघडीत असे. गेल्या दोन वर्षांत आपली किंवा आपल्या प्रिय पत्नीची इहलोकांतून उचलबांगडी कशी झाली नाहीं, ह्याचंच बगोबांना राहून राहून आश्चर्य वाटे. आज गंगूनानांनीं त्यांच्यावर लादलेलं मांजर छबुताईच्या उद्घोषित आवडीनिवडीविरुद्ध घरीं घेऊन जाण्यास ते तयार झाले होते, ते केवळ अशी कीर्ति असलेल्या आडमुठ्यांच्या वाड्यांत ते राहत होते म्हणूनच !

बगोबा तें मांजराचं पिल्लूं घेऊन आपल्या घरीं पोहोंचले, तेव्हां छबूताई स्वयंपाकघरांत होत्या. त्यावेळी 'बाजरी' ह्या नांवाखालीं कांहीं बाजरीचे दाणे, बराचसा कचरा व पुष्कळशीं मातीचीं ढेकळं ह्यांचं जें मिश्रण सरकार नागरिकांना पुरवीत असे, त्याच्या पिठाच्या भाकऱ्या बडविण्यांत त्या गर्क होत्या. स्वयंपाकखोली असूर्यंपश्या अत-

एव अंधारी होती, पण कोपऱ्यांतील चुलींतील विस्तवाच्या लालसर प्रकाशानं ती थोडीशी उजाळलेली होती. मांजराचं तें काळंकुट्ट पिल्लूं दोन्ही हातांनीं आपल्या तोंडाशीं धरून बगोबांनीं भीतभीतच स्वयं-पाकखोलींत प्रवेश केला.

बराच वेळ बगोबा आल्याचं छबूताईंच्या ध्यानांतच आलं नाहीं. बगोबांनीं आपल्या आगमनाची सूचना देण्याकरितां एकदोनदां खांक-रून पाहिलं. त्यानंहि आपला हेतु सफल होत नाहीं, असं पाहून मग ते चांगले जोरजोरानं खोकले. आतां मात्र छबूताईंनीं एकदम दचकून त्यांच्याकडे पाहिलं, आणि क्षणभरानं त्या म्हणाल्या, "बाई, बाई, सिग्रेटी सोडून द्या म्हणून मी म्हणतें तर उलट एकदम दोन दोन सिग्रेटी तोंडांत कोंबायला सुरुवात केलीत्! ओढा सिग्रेटी अन् मग खोका क्षयरोग्यासारखे! ..."

छबूताईंचा हा हल्ला अगदींच अनपेक्षित होता. मांजराच पिल्लूं आणल्याची बातमी बगोबांना जरा लाडीगोडीनंच फोडायची होती. त्या दृष्टीनंच त्यांचा प्रयत्न चालला होता. पण त्याचा परिणाम मात्र अगदीं अनपेक्षित झाला होता. आपल्या खोकण्याचा छबूताईंनीं असा विपरीत अर्थ घेतलेला पाहून ते गोंधळून गेले. त्यांतून आपण एकदम दोन दोन सिग्रेटी तोंडांत कोंबल्या आहेत, ह्या छबूताईंच्या आरोपानं तर ते हतबुद्धच झाले.

"उडवा पैसे सिग्रेटींत!" ते असे गोंधळून उभे असतां छबूताई म्हणाल्या, "मला कांहीं घ्यायचं असलं म्हणजे एकदम महागाई होते, अन् स्वतः मात्र पैशाची राख करायची!...मग मी तरी आतां हीं फाटकीं लक्तरं कशाला नेसूं? थांबा, आजच आणतें मी चांगलीं भारीपैकीं दोन पातळं!"

संभाषणाला भलतंच वळण लागत चाललेलं पाहून आपल्या तिजो-

रीच्या रक्षणाकरितां सिद्ध होणं बगोबांना भागच पडलं. ते जरा समजावणीच्या स्वरांत म्हणाले, "असं हें भलतंच काय बोलतां? तुमच्या सांगण्याखातर मीं सिग्रेट सोडून दिली, त्याला चांगले दोन महिने होऊन गेले. मग आतां तें कशाला उकरून काढतां?"

"म्हणे सिग्रेट सोडली! सिग्रेट बरी सोडाल! एक वेळ मला सोडाल, पण सिग्रेट? देवाचं नांव घ्या!...काय बाई तरी निलाजरेपणा! तोंडांत चांगल्या दोन सिग्रेटी कोंबल्यात नि म्हणे सिग्रेट सोडून दोन महिने झाले–मी आंधळीच कीं नाहीं जशी!"

"काय म्हणतां? माझ्या तोंडांत दोन सिग्रेटी आहेत!"

"आहेत म्हणजे! त्यांचीं जळतीं टोकं चांगली चमकताहेत कीं!"

"चमकताहेत! वाहवा! अहो, त्या सिग्रेटी नाहीत! मी सिग्रेट सोडून दोन महिने झाले, देवा शपथ!...मीं हे तुमच्याकरितां काय आणलंय्, ओळखा पाहूं!"

"समजलं! म्हटलं फार प्रेम की नाही बायकोवर! तेव्हां आणली असेल एखादी हिऱ्याची जोडी!"

लग्न झाल्यापासून चार वर्षं झालीं होतीं, पण आपल्या सहचरीशीं कसं बोललं असतां संभाषणाचं वांकडं पाऊल पडणार नाहीं, ह्याचा बगोबांना अजून कांहींच अंदाज घेतां आला नव्हता. कांहींहि धुसफुस न होतां छबूताईशीं एखादं संभाषण पार पाडणं, हें त्यांना कपड्यांत शिरलेली एखादी झिनॉप्सिल्ला चिऑपिस पकडून काढण्याइतकं अवघड वाटत होतं. उठल्यासुटल्या छबूताई त्यांना इतकं बोचक बोलत कीं. केव्हां केव्हां बगोबांना जीव नकोसा होई. त्यांना शंका येई, आपल्या धर्मपत्नीची जीभ मांजराच्या जिभेसारखी कांटेरी तर नाहीं ना? ते छबूताईंशीं जितकी लाडीगोडी करण्यास जात तितकं तें त्यांच्या अंगाशीं येत असे. लुगड्यावरून आतां प्रकरण हिऱ्यापर्यंत

गेलं होतं, तेव्हां तें आतां कौस्तुभमण्यापर्यंत जाण्याच्या आधींच ह्या प्रकरणाचा सोक्षमोक्ष करण्याच्या उद्देशानं ते म्हणाले, " हिरे! महि-न्याला महागाई भत्ता धरून सत्तावन्न रुपये मिळवणारा मी कारकून! मनांत असलं तरी बायकोकरितां मी काय हिरे आणणार! ...पण हें आज मीं जें काय आणलंय् त्यालाच आपण 'हिरा' म्हणूं या, म्हणजे झालं!"

असं म्हणून त्यांनीं तें पिल्लूं अलगद जमिनीवर ठेवून दिलं.

स्वयंपाकखोलींतील त्या अंधारांतून ते दोन निखारे आपल्या दिशेनं सरकत येत असलेले पाहून छबूताईंना भीति वाटूं लागली. हा काय भुताटकीचा खेळ आहे, हें त्यांस समजेना. विस्फारलेल्या डोळ्यांनी निखाऱ्याकडे त्या पाहत आहेत, तों ते निखारे अगदीं त्यांच्या जवळ येऊन पोहोंचले, व त्यांच्या पायांना कसला तरी बिलबिलित स्पर्श झाला. त्याबरोबर त्यांचं सारं अंग शहारलं आणि एक किंकाळी फोडून त्या एकदम उभ्या राहिल्या.

" अहो, येवढं घाबरायला काय झालं? नुसतं मांजराचं पिल्लू आहे तें!" बगोबा समजुतीच्या स्वरांत म्हणाले.

" मांजराचं पिल्लूं! तें कशाला आणलं घरांत? तुम्हांला माहीत आहे ना मला मांजरं आवडत नाहींत तें?—आणि म्हणे माझ्याकरितां कांहीं तरी आणलंय्! काय? तर मांजर! हूं:! घेऊन जा तें!"

बगोबांनीं मग त्यांना प्लेगची हकीकत सांगितली. गंगूनानांच्या व्याख्यानांतील जे जे भयंकर शब्द आठवले, त्यांचा त्यांनीं वारंवार उच्चार केला; नागरिकांचीं सामाजिक कर्तव्यें त्यांना समजावून दिलीं; मांजरांचं गुणवर्णन करून मांजरांविषयींची छबूताईंची नावड किती अनाठायीं आहे, हें पटवून देण्याचा प्रयत्न केला. आणि अखेरीस जेव्हां धटिंगणाच्या दुकानांतील छबूताईंना आवडलेलं पातळ आणून देण्याचं

त्यांनीं कबूल केलं, तेव्हां छबूताई मांजराला थोडे दिवस घरीं ठेवून घेऊन त्याची 'ट्रायल' घेण्यास तयार झाल्या.

आपण छबूताईकडे केलेल्या गुणवर्णनाबरहुकूम आपली हिरा वागेल, नि आपल्या वैवाहिक आयुष्यांतील छबुताईवरील पहिलाच विजय आपण संपादन करूं, अशी बगोबांना उमेद होती. पण त्यांची हिरा नंबर एकची खटघाळ निघाली. बगोबांनीं केलेल्या गुणवर्णनाच्या अगदीं विरुद्ध वागण्याचा जणुं तिनं विडाच उचलला होता. बगोबांनीं मांजराच्या स्वच्छपणाची छबूताईंकडे तारीफ करावी, नी छबूताईंच्या पांघरुणांतच हिरानं ओकून ठेवलेलं दिसून यावं. मांजरांच्या प्रेमळपणाविषयीं बगोबांनीं प्रवचन करावं, व थोडयाच वेळांत छबूताईंनीं आपल्या हातावरचे हिराच्या नखांचे ओरखडे दाखवावेत, किंवा हिरानं आपल्या कानाच्या पाळयांचा चावा घेतला, म्हणून अकांडतांडव करावं. उंदीर मारणं हा मांजराचा निसर्गसिद्ध धर्म आहे असं सांगून त्यांनीं मांजरांची उपयुक्तता सिद्ध करावी, आणि जणुं काय उंदरांमध्यें व आपणांमध्यें युद्धतहकुबीचा संधि झाला आहे, अशा रीतीनं डोळयांसमोर उंदरांचा धुडगूस चालू असतां, हिरानं चुलीवर एखाद्या स्थितप्रज्ञाप्रमाणं बसून राहावं आणि उंदरांकडे पूर्ण दुर्लक्ष करावं! एखाद्या खुराक खाऊन आणि मेहनत करून माजलेल्या पहिलवानाचा आपण निःशंकपणानं पुरस्कार करावा, नी कुस्तीला कुठं सुरुवात होते न होते तों, त्याचे चारी मुंडे मातीला लागलेले दिसावेत; तसाच कांहींसा प्रकार हिराच्या बाबतींत बगोबांचा झाला होता. मांजरांविषयींचा छबूताईंचा दुराग्रह कमी होण्याऐवजीं हिराच्या वर्तनानं उलट वाढतच चालला होता. आधींच तीक्ष्ण असलेल्या त्यांच्या जिभेला अधिकच धार चढत होती.

आतांपर्यंत हिराला हद्दपार करण्याविषयीं छबूताईंनीं अनेक निर्वाणीचे खलिते पाठविले होते; पण प्लेग वाढत्या प्रमाणावर आहे, ह्या सबबीवर बगोबांनीं ते थोपवून धरले होते. जर्मनीची विद्युत् चढाई पूर्ण जोरांत असतांना दररोज एखादं नवं शहर पडल्याच्या बातम्या जशा येत, तशाच, आज देवळाली लागलं, आज भगूर लागलं, आज नाशिक रोड, तर आज डचकपचक, आज तर सातपूर, अशीं नाशिकाच्या परिसरांतील खेडीं प्लेगनं एकामागून एक सर केल्याच्या बातम्या येऊन थडकत होत्या. होतां होतां नाशकांतहि उंदीर पडूं लागले. आज धारुअण्णांच्या घरीं उंदीर पडला, आज गणेशशास्त्र्यांकडे पडला, अशा बातम्यांनीं नाशिक हवालदील होऊं लागलं. आडमुठ्यांच्या वाड्याच्या दिशेनं निश्चित होत असलेली प्लेगची ही प्रगति, बगोबांना स्पष्ट दिसत होती, आणि एकंदर परिस्थितीचा भीषणपणा छबूताईंच्या मनाला पटवून देऊन, ते हिराचं आपल्या घरांतील वास्तव्य कसंबसं वाढवीत होते.

त्याच दिवशीं रात्रीचें जेवण, हिरानं छबूताईंच्या ताटांत तोंड ालण्याचा एकदोनदां प्रयत्न केल्यावर—छबूताईंनीं मोठा कडकडाट करून, त्या हिऱ्याला पैलू पाडण्याचे केलेले प्रयत्न वजा करतां—उदास आणि भीषण शांततेंतच पार पडलं. दोन्ही पक्षांत सलोखा न होतांच निजानीज झाली.

बगोबांचा नुकताच कुठं डोळा लागला असेल, एक भयंकर किंकाळी त्यांच्या कानांवर पडली, आणि ते खडबडून जागे झाले. किंकाळीच्या पाठोपाठ 'भूत! भूत!' हे शब्दहि त्यांना ऐकूं आले, आणि तो किंकाळी फोडणारा आवाज छबूताईंचाच आहे, हेंहि त्यांस समजून आलं. पांघरुण दूर सारून ते माजघरांत धांवले. एक काडी पेटवून तिच्या प्रकाशांत ते समोरील दृश्य पाहूं लागले.

बिछान्यावर पडलेल्या छबूताई अगदीं फिट् आल्यासारख्या धडपडत होत्या, आणि त्यांच्या छातीवर आपला तोल सांभाळण्याची शिकस्त करीत त्यांची हिरा केंविलवाण्या मुद्रेनं बसलेली होती!

सारा प्रकार त्यांच्या ध्यानांत आला. छबूताईंची भीतीनं गाळण उडविण्याच्या मुळाशीं एखादं खरोखरीचं भूत नसून, आपली हिराच आहे, हें पाहून त्यांना जरा वाईटहि वाटलं. त्यांनीं हिराला अलगद उचलून घेतलं, व तिला घेऊन ते गुपचूप आपल्या बिछान्यावर जाऊन झोपले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चहाची वाट पाहून कंटाळल्यावर बगोबांनीं आंतल्या खोलींत दृष्टिक्षेप केला, आणि छबूताई आपली सामानाची ट्रंक भरीत असलेल्या पाहून त्यांना आश्चर्याचा धक्काच बसला.

"हें काय? ही कुठली तयारी?" त्यांनीं विचारलं.

"माहेरीं जातें मी!"

"माहेरीं? तें कां?"

"ह्या भुताटकीच्या वाड्यांत राहयचं नाहीं मला!"

"कोण म्हणतो हा वाडा भुताटकीचा आहे म्हणून?"

"मग रात्रीं कोणी धरलं होतं मला? तुम्हांला काय? चांगले डाराडूर झोपले असाल! इकडे भुतानं माझा गळा दाबून जीव घेतला तरी तुम्हांला पत्ता नाहीं लागायचा!"

"अहो, पण तें भूत नव्हतं. आपली हिरा होती ती!" आतां रात्रीचा खरा प्रकार सांगणं बगोबांना भाग होतं.

थोडा वेळ छबूताईंनीं आश्चर्यमिश्रित रागानं त्यांच्याकडे पाहिलं, नि मग त्या म्हणाल्या, "खरं भूत नाहीं तर हें काळं भूत! हें भूत असेतोंवर मी ह्या घरांत राहणार नाहीं. मी जातें माहेरीं, मग घेऊन बसा तुम्ही आपल्या हिराला!"

" अहो, हिराला आतां कसं देतां येईल? कालच आपल्या शेजारीं उंदीर पडला ! ..."

" पडूं दे. होऊं दे मला मेलीला प्लेग ! ह्या मांजराच्या त्रासानं मरण्यापेक्षां प्लेगनं मेलेलं काय वाईट ! अन् मी मेलें तर बरंच झालं तुम्हांला ! ....आतां शेवटचं निक्षून सांगतें. मी पाहिजे असेन तर ह्या मांजराला सोडून या कुठं तरी. आणि उंदीर पकडायला पिंजरा आणा एक कमिटींतून !"

अखेरीस हिराला ताबडतोब हद्दपारीची सजा देण्याचं जेव्हां बमोबांनीं छबूताईंच्या हातापाया पडून कबूल केलं, तेव्हांच छबूताईंनी ट्रंक भरण्याचं बंद केलं व चूल पेटवली.

अनंतचतुर्दशीच्या दिवशीं, दहा दिवसांकरितां घरीं आणलेल्या निर्जीव गणपतीची बोळवण करतांना, बगोबांच्या डोळ्यांत अश्रू उभे राहत; मग हिरा तर काय? जिवंत हाडामांसाचा गोळा होता, आणि ह्या पंधरा दिवसांत त्यांना तिचा लळा लागला होता. ह्या अफाट जगांत हिराला आपल्या हातांनीं पोरकी सोडून देण्याची कल्पना त्यांना असह्य झाली. ह्या जगांत तिचा घांस घेण्याकरितां टपून बसलेलीं दुष्ट कुत्रीं होतीं, माजलेले बोके होते, तिला दगडांनीं मारून हैराण करणारीं व्रात्य पोरं होतीं. परंतु आतां काळजाचा दगड बनवून त्यांना हें कृत्य करणं भागच होतं. त्यांनीं एकदां तिला आपल्या हातांनीं शेवटचं दूध पाजलं, आणि एका पिशवींत तिला घालून जड पावलांनीं ते बाहेर पडले.

पुष्कळसं फिरूनहि त्या इवल्याशा जीवाला एकटं सोडून देण्याला योग्य अशी एकहि जागा त्यांना सांपडेना. कितीतरी वेळ ती पिशवी हातांत घेऊन ते वेड्यासारखे गांवांतील रस्त्यावरून फिरत होते.

हो, पण असं केलं तर!—फिरतां फिरतांच त्यांना एक कल्पना

सुचली, आणि हायसं वाटलं. हो असंच करावं. गंगूनानांच्या घराजवळच तिला सोडून द्यावं. ती गंगूनानांच्या घरीं जाईल, आणि गंगूनाना तिचा सांभाळ करतील. गंगूनानांनीं विचारलं तर सांगूं, " तें पळून तुमच्याकडे आलं " म्हणून ! त्यांनींच मांजरीच्या दिशाज्ञानाबद्दल व एकाच घराविषयीं त्यांना वाटणाऱ्या प्रेमाबद्दल त्या दिवशीं आपणांला नव्हतं का सांगितलं ?

एकाच फेरींत त्यांनीं हिराला गंगूनानांच्या घराच्या पिछाडीस सोडूनं दिलं, व कमेटींतून उंदराचा पिंजरा आणला.

हिराची हकालपट्टी झाल्यामुळें छबूताई आज खुषींत होत्या, आणि घरांतील परिस्थिति पुष्कळच निवळली होती. रात्रीं बगोबा जरा समाधानानंच बिछान्यावर पडले.

थोडाच वेळ ते तसे पडले असतील, स्वयंपाक खोलींत जिथं पिंजरा ठेवला होता, त्या दिशेनं बराच मोठा गलका त्यांच्या कानांवर येऊं लागला.

" कसली गडबड ही ? " बगोबांनीं छबूताईंना विचारलं.

" पिंजऱ्यांत उंदीर आलेत वाटतं ! आतां आठ दिवसांत घरांतले सारे उंदीर नाहीसे होतात कीं नाहीं पाहा. नाहीं तर तुमची ती हिरा ! हूं: ! " छबूताई म्हणाल्या.

जसजसा वेळ जाऊं लागला, तसतसा तो गलका अधिकच वाढूं लागला. उंदरांच्या चिवचिवीमुळं त्यांना स्वस्थपणानं झोपणंहि अशक्य होऊं लागलं. त्या गलक्यावरून बगोबांना वाटलं, जणूं काय काँग्रेसच्या उंदरांनीं भरविलेली निवडणुकीची प्रचारसभा, हिंदु महासभेचे उंदीर उधळून लावण्याचा प्रयत्न करीत असावेत. अखेरीस ती गडबड असह्य होऊन, काय प्रकार आहे हें पाहण्याकरितां छबूताईंसह बगोबा स्वयंपाकखोलींत गेले.

त्यांनीं एक काडी शिलगावली. पिंजऱ्यावर उंदरांची नुसती झुंबड उडाली होती. पण पोलिस येतांच दंगेखोरांनीं पळ काढावा, तसा त्यांनीं बगोबांची चाहूल लागतांच पळ काढला. त्यांच्या हातांतील काडी जळत आली होती. ती पूर्ण विझण्यापूर्वीं, पिंजऱ्यांत एक मोठा उंदीर किंवा घूस सांपडली असावी, हें बगोबांनीं पाहून घेतलं. पिंजरा आणल्याच्या पहिल्याच दिवशीं भली मोठी शिकार सांपडली, ह्या आनंदांत त्यांनीं दुसरी काडी पेटवली, आणि पिंजऱ्यांत पाहिलं.

त्यांचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. पिंजऱ्यांतील थाली-पिठावर अधाशीपणानं ताव मारीत बसलेला प्राणी उंदीर किंवा घूस नसून त्यांचीच भुकेलेली काळीकुटट् हिरा होती ! तिनं एकदां त्यांच्याकडे पाहिलं, आणि किंचित्‌शा आर्त स्वरांत 'गुड् इव्हिनिंग' केल्याप्रमाणं 'म्या ऽ व्' केलं !

---

# ४. मीं केलेली चोरी

कांहींकांहीं गोष्टी अशा असतात, कीं माणसाजवळ कितीहि पैसा असला तरी त्या त्याला पैसे देऊनहि मिळूं शकत नाहींत. अन् मग माणसाला ती वस्तु आडमार्गानं मिळवणं प्राप्त होतं.

'पैसा देऊनहि मिळूं न शकणारी वस्तु!—' तुम्ही कथाकादंबऱ्यांचे वाचक असाल तर हे शब्द तुमच्या डोळ्यांखालून हजारों वेळां गेलेले तुम्हांला आढळतील. हे शब्द पाहून तुम्हांला वाटेल, कीं आतां एखादी प्रेमाची भानगड मी तुम्हांला सांगणार आहें अन् तुम्ही सरसावून बसाल.

छे छे! आतां मला प्रेमाविषयीं बोलतांच येणं शक्य नाहीं. कारण लग्नाच्या बंधनांत मी पडल्यापासून माझ्या प्रेमाच्या खजिन्यावर एक पहारेकरी डोळ्यांत तेल घालून बसलेला आहे.

मी सांगणार आहें तें छत्रीबद्दल.

लढाईमुळं छत्र्या महाग होतांहोतां, सरकारनं छत्र्यांवर नियंत्रण बसविलं. त्याचा साहजिक परिणाम म्हणून छत्री बाजारांतून अदृश्य झाली! यंदाच्या पावसाळ्याला सुरुवात झाल्यापासून मी एखादी नवी छत्री विकत घेण्याच्या शोधांत होतों. पण बाजारांतच छत्री नसल्या-मुळं माझ्या परिश्रमांवर (एकदोनदां पावसाचंहि) पाणी पडलं!

आतां काय करावं? पावसाळ्यांत छत्रीवांचून कसं चालणार? अन् माझ्या असंहि दृष्टोत्पत्तीस येऊन चुकलं होतं, कीं आमच्या गांवचं पर्जन्यमान सरासरी २५–३० इंचच असलं तरी छत्र्या दुर्मिळ होऊं

लागल्यापासून गेल्या दोन वर्षांत तें चाळीस इंचांच्या वर जाऊन पोंचलं होतं! आणि लढाईच्या शेवटच्या वर्षीं बाजारांत छत्री अजिबात मिळेनाशी होऊन एकदोनदां पावसांत चांगला भिजून निघाल्यावर मला शंका येऊं लागली, कीं आपण चेरापुंजीला तर चुकून राहायला आलों नाहीं ना? आमच्या गांवच्या बाजारांत छत्री मिळत नाहीं असं दिसतांच, वरुणराजाला आमचा गांव एकदम प्रिय झालेला दिसून येत होता.

छत्रीचे उपयोग काय? ऊन, पाऊस, म्हशी, सावकार वगैरेवगैरें-पासून स्वतःचं संरक्षण करून घेणं! हे उपयोग तर झालेच, पण माझ्या दृष्टीनं छत्रीचा मुख्य उपयोग म्हणजे छत्री हरवणं व त्यामुळं आपल्या विस्मरणशीलतेची आठवण होणं हाच होय! आतांपर्यंत दर पावसाळ्या-ला कमींत कमी एक याप्रमाणं मी छत्र्या हरवल्या होत्या व सध्यां तर मी छत्रीच्या बाबतींत विधुरच होतों.

तुम्ही म्हणाल, छत्री नाहीं तर नाहीं; पण रेनकोटहि नव्हता का तुमच्याजवळ? होता. पांचसहा वर्षांपूर्वीं मोठ्या हौशीनं मीं एक रेनकोट विकत घेतला होता. पण रेनकोटाच्या बाबतींत मी एक पाहून ठेवलं होतं. आभाळ अगदीं ढगांनीं भरून आलं आहे असं पाहून, रेन-कोटाचं ओझं खांद्यावर टाकून पावसाच्या आशेनं नि मोठ्या उत्साहानं बाहेर फिरायला पडावं, तर फिरून परत येईपर्यंत आकाश अगदीं निरभ्र झालेलं असावं! बरं, आकाशांत ढगाचा मागमूसदेखील नाहीं असं पाहून रेनकोट न घेतांच बाहेर पडावं, तर फिरून घरीं परत येई-पर्यंत भिजून ओलंचिंब व्हावं! दोनतीनदां हा अनुभव आल्यानं आकाश निरभ्र दिसलं, त्याच्या कानाकोपऱ्यांत ढगाचा मागमूसहि दिसला नाहीं कीं मी बिनचूक रेनकोट घेऊन बाहेर पडूं लागलों नि लोकांच्या थट्टेचा विषय होऊं लागलों! निदान माझी तरी खात्री झाली आहे

कीं रेनकोटाचे खरे उपयोग दोनच. एक म्हणजे शोभा; व दुसरा म्हणजे कोटाची बाही किंवा कॉलर त्याच्या ओझ्यानं चुरगुळून टाकणं! माझ्या त्या रेनकोटावर पावसाचा कधीं थेंबहि पडला नाहीं! दर वर्षी पावसाळा सुरू झाला कीं सारी अडगळ उस्कटून मी तो मोठ्या नियमितपणानं बाहेर काढी आणि पावसाळा संपला कीं परत अडगळींत टाकून देई. त्यानं मला ह्याप्रमाणं तीनचार वर्षं 'काम' दिल्यावर, अखेरीस बाजारांतून छत्री अदृश्य होण्याच्या ऐन सुमारासच तो कसरीच्या भक्ष्यस्थानीं पडला! त्या 'सहस्राक्षा' ला अंगांत घालून दिवसाचं बाहेर पडणं लोकापवादामुळं शक्यच नव्हतं आणि ह्या वर्षीच्या भयंकर पावसाळ्यांत त्याला अंगांत घालून कांही फायदाहि झाला नसता.

मी जी छत्रीची चोरी करण्याला प्रवृत्त झालों त्याची पार्श्वभूमि ही अशी होती.

त्या दिवशीं दुपारीं मी बँकेंत पैसे काढण्याकरितां गेलों होतों. बँकेंतून रक्कम काढून मला ती ताबडतोब मनीऑर्डरीनं बाहेरगांवीं पाठवून द्यायची होती. मी बँकेंत जायला निघालों त्या वेळी नेमका जोराचा पाऊस पडत होता, तेव्हां टांगा करून बँकेंत गेलों. बँकेंतील कारकुनांच्या कामाच्या उरकाची मला चांगलीच कल्पना असल्यामुळं, व टांग्याला दोन तास रखडत ठेवून त्याला नुसतं उभं राहण्याबद्दल पैसे देण्याची कल्पना मला आवडत नसल्यामुळं, टांगेवाल्याचे पैसे चुकते करून मी त्याला जायला सांगितलं. म्हटलं, बँकेकडून पैसे हातांत पडल्यावर पाहूं. तोंपर्यंत वरुणराजा कदाचित् माझ्यावर मेहेरबानी करून अश्रू ढाळण्याचं बंद करील किंवा ऐनवेळीं एखादा टांगाहि मिळेल.

बँकेंतून पैसे काढण्याविषयींचे सारे विधि आटोपून पैसे हातांत

पडण्याची वाट पाहत मी एका खिडकीशीं जाऊन उभा राहिलों. पाऊस पडत असल्यामुळं रस्त्यानं जाणारे-येणारे लोक छत्र्या उघडूनच चालले होते. त्यांच्या छत्र्यांकडे पाहत मी मनाची करमणूक करून घेऊं लागलों. कुणी आपल्या पुराण्या छत्र्या बाहेर काढून त्यांना भलीं मोठीं ठिगळं लावलेलीं दिसत होतीं. कुणाच्या साधारण बऱ्यापैकीं दिसणाऱ्या छत्रीवरून एक नांव पुसून काढून सध्यांच्या तिच्या मालकाचं नांव भल्या मोठ्या अक्षरांत नवीनच घातलेलं दिसून येत होतं. कुणा एखाद्याच्या छत्रीच्या छताला मोठं भगदाड पडलेलं असे नि चालतांना तें बरोबर पावसाच्या विरुद्ध दिशेला येईल अशा रीतीनं छत्री फिरविण्याच त्याचं कसब कौतुक करण्यासारखं असे. कुणाच्या छत्रीचा उपयोग पावसाचं पाणी गळून आपल्या अंगावर घेण्यापुरताच होई! छत्र्यांच्या दुष्काळांतील छत्र्यांचे हे निरनिराळे नमुने पाहत साधारण तास दीड तास माझी चांगलीच करमणूक झाली. इतक्यांत माझ्या नांवाचा पुकारा झाला. मी काढीत असलेल्या रकमेचा आंकडा मला विचारण्यांत येऊन मी मीच आहें ह्याविषयीं शहानिशा करण्यांत आली आणि अखेरीस माझ्या हातांत एकदांची रक्कम पडली.

मीं घड्याळांत पाहिलं. अडीच वाजले होते. मनीऑर्डर करण्याचा पोस्टाचा टाईम तीन वाजेपर्यंतच होता. मध्यें थोडा वेळ वरुणराजा विश्रांति घेत असला—बहुधा बँकेच्या गोऱ्या एजंटाप्रमाणं त्याचाहि तो 'लंच-टाईम' असावा—तरी आतां माझ्या अपेक्षेच्या बरोबर विरुद्ध बाहेर मुसळधार पाऊस पडत होता. जणूं 'लंच' मधला एखादा पदार्थ अळणी होता नि त्यामुळं चिडलेला वरुणराजा दांतओठ खाऊन आपलं काम करीत होता. दृष्टीच्या टप्प्यांत एखादा टांगाहि दिसत नव्हता. पायीं गेलं तर पोस्ट ऑफिस दहा मिनिटांच्या रस्त्यावर होतं. आणि आतां तर पायीं जाण्याखेरीज गत्यंतर नव्हतं. पण

ह्या असल्या पावसांत छत्रीशिवाय कसं जाणार? ह्या वेळीं माझ्या-जवळ एखादी छत्री असती तर?....

हा विचार मनांत येतांच एका खिडकीकडे माझी दृष्टि वळली. त्या खिडकीच्या गजांना एक नवी कोरी आणि फॅशनेबल पांढऱ्या मिकाच्या मुठीची छत्री अडकवून ठेवलेली मी आल्यापासून पाहत होतों. अजूनहि ती तिथंच होती. मी बँकेंत आलों त्या वेळीं बँकेंत असलेले लोक आतांपावेतों निघून गेले होते व लोकांचा एक दुसरा संच बँकेशीं व्यवहार करीत होता. अर्थात् त्यांपैकीं कुणाची ती छत्री नव्हती, हें निश्चित. बँकेंतील कुणा कारकुनाची ती छत्री असणं शक्यच नव्हतं. कारण अशी नवी कोरी व सध्यांच्या दिवसांत निदान पंचवीस रुपये किंमत असलेली छत्री एखाद्या कारकुनानं केवळ आपला देह भिजूं नये म्हणून विकत घेतली असणं व ती त्यानं घेतली असल्यास अशी कुणाचाहि हात पोचेल अशा मोकळ्या ठिकाणीं ठेवून देणं, ह्या दोन्ही गोष्टी एकापेक्षां एक अशक्य होत्या. बहुतेक कुणीतरी ती छत्री विसरूनच गेला असावा. माझ्या तर्कपद्धतीप्रमाणं सध्यां तरी ती छत्री पोरकी असावी, अशी मला खात्री वाटत होती.

मग लांबवावी का ती छत्री? सध्यांच्या परिस्थितींत हा अति-योग्य विचार माझ्या मनांत आला. पण तो येतांच माझ्या मनावरील पांढरपेशे संस्कार एकदम उफाळून आले. "चोरी कधीं करूं नये!" ही क्रमिक पुस्तकांतील कविता हातांत छडी धरून म्हणत असलेले उग्र चेहऱ्याचे माझे लहानपणचे मास्तर माझ्या डोळ्यांसमोर नाचूं लागले. सत्य, नीति, सामाजिक स्थैर्य वगैरे अनेक गोष्टींनीं माझ्या मनांत गर्दी केली व त्या छत्रीची चोरी करण्याविषयीं माझं मन मागं-पुढं होऊं लागलं.

पण तुम्हीं मोठमोठ्या समाजशास्त्रज्ञांना, मानसशास्त्रज्ञांना विचा-

राल, तर ते तुम्हांला सांगतील, कीं बहुतेक चोरी करण्याची जन्मजात प्रवृत्ति नसते. भांडवलशाही, सामाजिक विषमता व प्रतिकूल परिस्थिति ह्यांनीं गांजल्यामुळंच चोर चोरी करण्यास प्रवृत्त होतो. सध्यांच्या क्षणाला माझी सामाजिक व वैयक्तिक परिस्थिति अशी होती, कीं त्या सर्वांचा नैसर्गिक शेवट एकाच गोष्टींत होणं शक्य होतं व ती गोष्ट म्हणजे चोरीच!

माझ्या मनांतील पांढरपेशा विचारांना मीं तसंच कोकलत ठेवलं आणि त्या छत्रीची चोरी करायचीच असा मनाचा हिय्या केला!

बँकेंतील सर्व मानवांची मी एकदां पाहणी केली, कुणाचंच भावी चोराकडे व चोरल्या जाणाऱ्या वस्तूकडे लक्ष नव्हतं. मोठमोठ्या पुस्तकांवर डोक्यावरील विजेच्या दिव्यांच्या प्रकाशांत माना मोडून आंकडे मोडण्यांत कारकूनवर्ग गढून गेला होता. कौंटरपाशीं उभे असलेले लोक चिठ्ठ्याचपाट्या लिहिण्यांत नाहीं तर पैसे मोजून घेण्यांत गर्क झाले होते. नाहीं म्हणायला बँकेचा पट्टेवाला मात्र एका स्टुलावर बसून त्या छत्रीकडें आणि मधून मधून माझ्याकडे पाहत होता. पण त्याचेहि डोळे झोपेनं जडावल्याप्रमाणं दिसत होते ही त्यांतल्या त्यांत आशादायक वस्तुस्थिति होती.

माझ्या हालचाली कुणाला संशयास्पद वाटूं नयेत म्हणून कांहींतरी चाळे करीत मी कालहरण करीत होतों व त्याच वेळीं डोळ्यांच्या कोपऱ्यांतून त्या पट्टेवाल्यावर नजर ठेवीत होतों. थोड्याच वेळांत त्याच्या पापण्या हळूहळू त्याच्या डोळ्यांना झाकूं लागल्या व त्याचं डोकं खालींखालीं येऊं लागलं. छत्रीहरणास हा काल योग्य आहे असं हेरून क्षणार्धात साऱ्या लोकांवरून मी दृष्टि फिरविली. माझ्याकडे कुणाचंच लक्ष नव्हतं. मी खिडकीशीं गेलों आणि आतां मी त्या छत्रीवर झडप घालणार—

इतक्यांत विजेचा धक्का बसावा तसा मी निश्चल उभा राहिलों!
'दिसते सोपी पण असते कठीण' ह्या अति मार्मिक शब्दांत कुणीसं कलेचं वर्णन केलं आहे. मला वाटतं, सध्यां ज्या कलेचा मी उपासक बनलों होतों त्या कलेइतकी दुसऱ्या कुठल्याहि कलेला ही मार्मिक उक्ति सार्थपणीं लागू पडत नसावी. माझ्यांत आणि त्या छत्रींत आतां सहा इंचाचंदेखील अंतर राहिलेलं नसावं. हात उचलून ती छत्री मी उचलण्याचा अवकाश, कीं ती छत्री माझी होणार होती. पण कांहीं केल्या माझा हात हालेना. जणूं माझ्या हाताला कुणी मणाचं ओझं बांधून ठेवलं होतं! त्या पावसाळी थंड हवेंतहि माझ्या अंगाला दरदरून घाम सुटला.

माझ्या मनाच्या कमकुवतपणाला मीं शिव्या दिल्या. ओठाशीं आलेला विजयाचा पेला दूर झाल्यावर हिटलरची जी अवस्था झाली असेल, तशी माझी अवस्था कुठल्यातरी अदृश्य शक्तीपुढं हार खाऊन झाली होती. अखेरीस हें अवघड काम आपल्याच्यानं व्हायचं नाहीं, तिथं पाहिजे जातीचे, असं ठरवून व प्रियतमेचा शेवटचा निरोप घणाऱ्या प्रियकराच्या दृष्टीनं एकदां त्या छत्रीकडे पाहून घेऊन मी आतां मागं वळणार, इतक्यांत माझ्या कानांवर शब्द आले, "साहेब, ही छत्री तुमची का?"

"हो!" मी इतका अट्टल खोटं बोलणारा असेन ह्याची मला हा 'ह्' च्या बाराखडींतील ओकारान्त एकाक्षरी शब्द उच्चारीपर्यंत कल्पनाहि नव्हती. तो शब्द उच्चारून झाल्यावर मी त्या मला प्रश्न विचारणाऱ्या व्यक्तीकडे पाहिलं. पाहतों तों तो पट्टेवालाच माझ्यासमोर उभा!

आतां मात्र माझ्या पायांचीहि शक्ति गेली. ह्या अवघड परिस्थितींतून मागं हुडकून काढण्याविषयीं मी माझ्या मेंदूला तांतडीचे संदेश

पाठवले. पण मेंदूंत तर सारं अराजक माजलं होतं. कुणाचा पायपोस कुणाच्या पायांत नव्हता. तरीपण शाब्बास माझ्या मेंदूची ! थोड्याच वेळांत स्वत:ला सांवरून घेऊन त्यानं मला एक नामी उत्तर सुचवलं– "अं...नाहीं ! माझी नाहीं ही छत्री ! पण दिसायला अगदीं माझ्या छत्रीसारखीच आहे ! ....कुठं गेली बुवा माझी छत्री ?...." मेंदूनं सुचविल्याप्रमाणं अशी थाप मारण्याच्या मी अगदीं बेतांत होतों. पण तेवढ्यांत तो पट्टेवालाच म्हणाला, " मग साहेब, ह्या दिसांत आपली छत्री ह्यावानी कुठंबी टाकून कसं चालंल? कुणीबी ती पळवून नेईल, म्हून तर म्या मगापासनं तिच्यावर अक्षी पाळत ठेवून बसलोंया ! " असं म्हणून ती छत्री खिडकींतून काढून त्यानं ती मोठ्या आदबीनं माझ्यासमोर धरली.

चोरी करण्याकरितां म्हणून नव्हे, पण चोरीचा येऊं पाहणारा आरोप टळावा म्हणून मग त्या छत्रीचा मीं मोठ्या रुबाबांत स्वीकार केला. मी बाहेर जाऊं लागतांच माझ्या पाठोपाठ लाचार चेहऱ्यानं येणाऱ्या त्या पट्टेवाल्याचं मनोगत ओळखून मी त्याच्या हातावर दोन आणे ठेवले व मग ती छत्री डोक्यावर धरून त्या मुसळधार पावसाला आव्हान देत मी रस्त्यावर पाऊल टाकलं.

पावसाळ्यांत गांवांतील रस्त्यावर चिखल फार होतो अशी गांवच्या नगरपालिकेविरुद्ध ओरड करण्याची मला संवय होती. पण सध्यांच्या माझ्यावरील संकटांत आमची नगरपालिकाच माझ्या साहाय्याला धांवून आली व मी तिला भरीत असलेल्या कराचं सार्थक झाल्याप्रमाणं मला वाटलं. माझ्या हातांत ती छत्री कुणी पाहिली तर ? कुणी तिला ओळखली तर ? अशी भीति मला मनांतून वाटत होती. पण रस्त्यावरील पाण्याचीं डबकीं टाळण्याचा व शक्य तेवढ्या कमी चिखलांतून चालण्याचा प्रयत्न करण्यांतच साऱ्या वाटसरूंचं लक्ष केंद्रित झालेलं

असल्यामुळं माझ्या छत्रीकडे मान वर करून पाहण्याला कुणाला फुरसतच नव्हती!

पोस्टांतीले काम आटोपून मी घरीं आलों. माझ्या हातांतील नवी छत्री पाहून साहजिकच सुलूनं विचारलं, "कुणाची ही छत्री?"

"माझीच." कोपऱ्यांत छत्री ठेवून देण्याच्या निमित्तानं तिची नजर चुकवीत मी म्हणालों.

"म्हणजे? विकत का घेतलीत?"

"हो. पंचवीस रुपयांना. पाऊस हा असा!" मी बेधडक खोटं बोललों. आपल्या धर्मपत्नीजवळ हरघडी खोटं बोलल्याखेरीज माणसाचं चालत नाहीं. आपण सत्यधर्मानं चालणारे नीतिमत्तेचे पुतळे, अगदीं सोवळे ब्राह्मण आहोंत अशी तिची समजूत करून देणं संसार-स्वास्थ्याच्या दृष्टीनं इष्ट असतं व त्याकरितां खोटं बोलल्याखेरीज गत्यंतरच नसतं!

"मग आतां कधीं हरवतां ही छत्री?" सुलूनं नेहमींच्या संवयी-प्रमाणं मला टोमणा मारला, पण मी तें हंसण्यावारीच नेलं.

मला काय कल्पना सुलूची ही भविष्यवाणी तंतोतंत सत्यसृष्टींत अवतरणार आहे म्हणून!

पुराणाप्रमाणंच चोरीची वस्तु गिळंकृत करणं सोपं असतं, पण ती पचविणं फारच जड असतं! त्यांतून साऱ्या जगासमोर डोक्यावर मिरवीत न्यावी लागणारी छत्रीसारखी वस्तु तर चोरून पचविणं फारच अवघड! साधारणतः छत्री-चोरांचं छत्री पचविण्याचं एक विशिष्ट तंत्र असतं. एखादी छत्री त्यांनीं चोरली कीं वर्ष दोन वर्षं तिला ते दडवून ठेवतात व मग मूळ मालकाची तिच्या खाणाखुणां-विषयींची आठवण आतां बुजली असेल असा अंदाज करून तिला राजरोसपणानं आपल्या डोक्यांवर मिरवितात.

हें नेहमीचं तंत्र झालं खरं. पण त्याचा उपयोग करून घेणं मला शक्य नव्हतं. कारण ती छत्री मी विकत आणली आहे, अशी मी सुलूला थाप मारली होती. तेव्हां ती छत्री घरीं लपवून ठेवून बिन-छत्रीनं पावसाच्या दिवसांत बाहेर पडतां येणं मला शक्य नव्हतं. म्हणून मी माझं एक निराळंच तंत्र तयार केलं.

संध्याकाळीं अंधार पडेपर्यंत मी घरींच दडी मारून बसलों. मी क्लबांत जावयास निघालों तेव्हां माझ्या 'इंद्राला' ( सहस्राक्ष रेन-कोटला ) मी अडगळींत शोधूं लागलों.

" काय शोधणं चाललंय् ? " सुलूनं येऊन विचारलं.

" माझा रेनकोट कुठं आहे ? " मी विचारलं.

" आतां कशाला रेनकोट ? एवढी सुंदर नवी छत्री आणलीय् पंचवीस रुपयांची अन् तो फाटका रेनकोट कशाला आतां ! " सुलू.

" अग असूं द्यावा आपला बरोबर. पाऊस हा असा. नुसत्या छत्रीचा काय टिकाव लागणार आहे ? कुठं भिजलों तर फटकन् न्युमोनिया व्हायचा ! " –मी.

न्युमोनियाचं नांव काढतांच सुलूनं आणखी शंकाकुशंका काढल्या नाहींत. पांचदहा मिनिटं खटपट करून माझा तो खटखटलेला 'इंद्र' तिनं मला काढून दिला.

मीं हातावर छत्री अडकवली व रेनकोटाची नीट घडी करून छत्रीची मूठ झांकली जाईल अशा बेतानं तो हातावर ठेवून दिला. हेंच तें माझं छत्री पचविण्याचं नवं तंत्र !

क्लबांतील मंडळीच्या दृष्टीस 'माझी' ती छत्री पडतांच साहजिकच तिच्याविषयीं सर्वांनीं पृच्छा केली. एखाद्या निर्ढावलेल्या छत्री-चोराप्रमाणं सुलूला मारल्या होत्या तशाच थापा मारून मीं त्यांचं समाधान केलं.

आम्ही ब्रिज खेळावयास सुरुवात केल्यावर थोड्या वेळानं प्रो. खरे आले. थोडा वेळ ते आमचा खेळ पाहत बसून राहिले. मग त्यांची दृष्टि एकाएकीं माझ्या छत्रीकडे गेली. थोडा वेळ त्यांनीं कांहींतरी आठवण करण्याची अगदीं एकाग्र मुद्रेनं भयंकर खटपट केली अन् मग ते स्वत:शींच हंसून म्हणाले, " अरेच्या ! माझी छत्री ही इथं आहे ! काल इथंच विसरून गेलों वाटतं ! अन् मी सारखं समजतों आहे, कीं मी बहुधा ती दुपारीं बँकेंत गेलों होतों तिथं विसरलों असेन म्हणून ! छे ! आतां मात्र माझ्या विसराळूपणाची कमाल झाली ! "

" कुठली छत्री ? " त्यांनीं बँकेचं नांव काढतांच मी दचकलों होतों. पण तो भाव दडवून ठेवून मी जरा रुबाबांतच त्यांना प्रश्न केला.

" ती पांढऱ्या मिकाच्या मुठीची. " त्या छत्रीवरील आपल्या स्वामित्वाविषयीं कुणी हरकत घेईल ह्याची कांहींच कल्पना नसल्या-मुळें प्रोफेसरसाहेब अगदीं सहज म्हणाले.

" अहो प्रोफेसरसाहेब, आपली कांहींतरी चूक होत आहे. ती छत्री माझी आहे ! " मी ठासून म्हणालों, " तुमच्या छत्रीवर कांहीं नांव-बीव होतं का ? "

" नांव ? " आपलं टक्कल हळुवारपणानं खाजवीत प्रो. खरे उद्-गारले. मग ते त्या छत्रीजवळ गेले व तिच्यावर नांव आहे का हें त्यांनीं पाहिलं. छत्रीवर नांव नाहीं असं पाहून ते पुन्हां टक्कल खाजवीत म्हणाले, " नांव होतं कीं नाहीं कांहीं आठवत नाहीं बुवा ! "

" अहो, ती छत्री माझी आहे. " त्यांचा विसराळू स्वभाव सुप्रसिद्ध होता. त्यामुळं ते संभ्रमांत पडलेले पाहून मी अगदीं निश्चयाच्या स्वरांत म्हणालों, " आजच विकत घेतली मी त्या अब्बासभाईकडून. एकच शिल्लक होती त्याच्याकडे."

" हो का ? मग सॉरी हं." प्रो. खरे दिलगिरीप्रदर्शक स्वरांत म्हणाले, " माफ करा हं ! माझा कांहीं तुमच्यावर तसा आरोप करण्याचा हेतु नव्हता...पण ही तुमची छत्री अगदीं माझ्या छत्रीसारखीच आहे म्हणून आपलं मला एकदम तसं वाटलं. एक्स्क्यूज् हं ! "

" छे छे ! त्यांत काय मोठंसं ! " दिलदारपणानं मी म्हणालों.

ती छत्री प्रो. खऱ्यांची होती हें निर्विवाद. मी बँकेत जातांना, हातांत छत्री नसूनहि ती उघडून डोक्यावर धरलेली असावी अशा पोजमध्ये आपला हात धरून त्यांना बँकेंतून बाहेर पडतांना मीं पाहिलं होतं ! पण आतां साऱ्यांना ती छत्री मी विकत आणली आहे असं ठासून सांगितल्यावर तीच बतावणी करीत राहणं मला भाग होतं. सुदैवानं छत्रीचा मालक प्रो. खऱ्यांसारखा विसराळू आणि मऊ स्वभावाचा निघाला, ह्या आनंदांत मी पुन्हां ब्रिज खेळू लागलों. प्रो. खरेहि टाइम्सचं वाचन करण्यांत गढून गेले.

ब्रिज खेळून संपल्यावर आम्ही घरीं जावयास निघालों. खिडकीशीं जाऊन मी छत्री पाहूं लागलों. पण छत्री जागेवर होती कुठं ?

मी छत्रीची बरीच शोधाशोध केल्यावर इतका वेळ बाहेरच्या व्हरांड्यांत बसलेल्या जोशींनीं मला विचारलं, " पांढऱ्या मुठीची होती का तुमची छत्री ? "

" हो, कुठं पाहिली का तुम्हीं ? "

" अहो, प्रोफेसर खऱ्यांनीं नेली ती मघांच. जातांना छत्री मला दाखवून म्हणाले देखील कीं, ' हा पहा आमच्या विसराळू स्वभावाचा आणखी एक नमुना ! ही माझी छत्री मी विसरलों होतों इथंच ! पण मला सारखं वाटत होतं मी ती बँकेंत विसरलों म्हणून ! चला, बरं झालं ! सांपडली एकदांची ! असे घोटाळे होतात माझ्या विसराळू स्वभावामुळं ! ' " नंतर हंसून जोशी म्हणाले, " आणि असं म्हणून अखे ीस त्यांनीं तुमचीच छत्री नेली का ? कमाल झाली बुवा खऱ्यांच्या विसराळू स्वभावाची ! "

---

# ५. कृतज्ञता

**ता. २० मार्च**

आज चारपांच दिवस दैनंदिनींत लिहायला वेळच झाला नाहीं. होणार तरी कसा ? बाळ इतका आजारी आहे. ह्या तीन दिवसांत तर आमचा बाळ राहतो कीं आम्हांला सोडून जातो ह्याचीच शाश्वती नव्हती. सारखा तापानं तळमळत होता. धड झोंपदेखील लागत नव्हती त्याला नि आम्हांलाहि. आतां कुठं त्याचा जरा डोळा लागला आहे. तापहि जरा कमी झाला आहे. म्हणून आज ही दैनंदिनी लिहायला थोडी उसंत मिळाली आहे.

खरोखरच हे तीनचार दिवस किती भयंकर मनःस्थितीत काढले आम्हीं ! बाळाच्या पोटांत सारख्या कळा निघत, आणि त्या वेदनांनीं तो विव्हळू लागला कीं, आमच्या मनांत कालवल्यासारखें होई. मालतीच्या तोंडाकडे तर मला पाहवतदेखील नाहीं. बिचारी! बाळाच्या खस्ता काढतेय. ह्या तीन दिवसांत तिच्या डोळ्याला डोळा नाहीं. काळजीनं आणि जागरणांनीं तिचा चेहरा कसा सुकून गेला आहे ! तिचे एरव्हीं चमकणारे डोळे कसे केविलवाणे, निस्तेज दिसत आहेत... आतां लिहितां लिहितां सहज दाढीवरून हात फिरवला. खरंच, माझी ही दाढी किती वाढली आहे ! दाढी करायला सुद्धां ह्या बाळाच्या आजारपणांत फुरसत कुठली मिळायला ? आरशांत माझा चेहरा पाहण्याचा कांहीं मला धीर होत नाहीं !—चला, आज बाळाला जरा आराम पडला आहे, तेव्हां उद्यां दाढी करायला कांहीं हरकत दिसत नाहीं.

डॉ. वामनरावांविषयींच्या आमच्या भावना मात्र कशा व्यक्त

कराव्यात, कांहीं कळत नाहीं. बाळाच्या आजारपणांत त्यांनीं फारच त्रास घेतला. रात्रीं–बेरात्रीं केव्हांहि बोलवलं तरी ते आले. एकदोनदां तर ते अर्ध्या ताटावरून देखील उठून आले. ते नुसते घरीं आले आणि त्यांनीं बाळाची तपासणी सुरू केली म्हणजे देखील मनाला किती धीर येतो. जसा कांहीं देवच आल्यासारखं वाटतं. त्यांचं बोलणं किती गोड! अगदीं लाख माणूस आहे. डॉक्टर असावा तर असा. माणूस नुसता स्वभावानंच चांगला आहे, असं नव्हे, तर आपल्या धंद्यांतहि ते अतिशय प्रवीण आहेत. ह्या दोनतीन दिवसांत बाळावर किती तरी कठीण प्रसंग आले. आमच्या तोंडचं तर पाणीच पळालं होतं. आतांच बाळाचा चेहरा कसा काळा पडला होता. त्याचा श्वासोच्छ्वास कसा मंद चालला होता. पण तेवढ्यांत डॉक्टर आले, आणि त्यांनी कसलंसं इंजेक्शन दिलं. पांचच मिनिटांत बाळाला तरतरी वाटली आणि गुलाम हंसूं लागला. डॉ. वामनराव म्हणजे एक धन्वंतरी आहेत. आणि त्यांचं एक एक औषध म्हणजे संजीवनी आहे!

माणूसहि किती चांगला. जेव्हां बोलवावं तेव्हां येतो; कधीं न बोलवतांहि येतो! केस गंभीर स्वरुपाची असली तर असं आपण होऊन जाण्याची त्यांची प्रथा आहे—पण पैशाविषयीं, बिलाविषयीं कधीं चकार शब्दानं देखील विचारीत नाहींत. त्यांचं बिल कितीहि झालं तरी मी देईन. होय. आमच्या बाळाच्या प्राणापेक्षां कांहीं पैसा अधिक नाहीं आम्हांला! डॉक्टरांचं हजार रुपये बिल झालं तरी देईन. माझी सारी इस्टेट देखील त्याकरतां जरूर पडल्यास विकीन. राजा हरिश्चंद्राप्रमाणें माझ्या देहाचा देखील लिलांव पुकारीन, पण डॉ. वामनरावांच्या बिलांतली एक दिडकीदेखील कमी करणार नाहीं. त्यांचे आमच्यावर इतके उपकार आहेत, कीं आमच्या कातडीचे जोडे करून जरी त्यांच्या पायांत घातले तरी ते उपकार कधीं फिटणं शक्य

नाहीं. खरोखरीच आम्ही भाग्यवान् म्हणून आमच्या बाळाच्या ह्या असल्या भयंकर दुखण्यांत डॉ. वामनरावांसारखा धन्वंतरी आम्हांला लाभला.–अरे–बाळ उठला वाटतं. जाऊन पाह्यलं पाहिजे त्याला...

ता. २१ मार्च

बाळाच्या प्रकृतींत काल रात्रीपासून निश्चित सुधारणा आहे. त्याचा ताप उतरला आहे. पोटांतल्या कळाहि थांबल्या आहेत. तोंडावर आज थोडी तरतरी दिसते आहे. डॉ. वामनराव आज दोनदां येऊन गेले. बाळाची तपासणी करून घाबरण्यासारखं कांहीं नाहीं, असं त्यांनीं सांगितल्यावर जीव खालीं पडला. दुपारीं मालतीला बळजबरीनंच मीं झोपायला लावलं. बिचारी! तिचेहि हाल बघवत नाहींत. डॉक्टरांच्या वाटेकडे डोळे लावून असते सारखी.

डॉक्टरांनीं काल रात्रीं बाळाला कसलं इंजेक्शन दिलं कुणास ठाऊक! पण जशी अगदीं जादू करावी, तसा त्या इंजेक्शननं बाळाचा आजार थांबला. डॉ. वामनराव म्हणजे प्रत्यक्ष अश्विनीकुमार आहेत. त्यांचा हात तरी किती हलका. इंन्जेक्शन दिलं, पण बाळाला कळलं-देखील नाहीं.

बस्! बस्! डॉक्टर असावा तर असा!

ता. २२ मार्च

बाळाची प्रकृति सुधारत आहे. खायला मागतो. पण डॉक्टरांची अजून परवानगी नाहीं. डॉक्टरांच्या शब्दाबाहेर आम्ही कांहींहि करणार नाहीं.

डॉक्टरांना आज बिलाविषयीं विचारलं. "देऊं सावकाश–काय घाई आहे? तुम्ही काय बिल बुडवणार आहांत थोडेच!" असं विनोदानं म्हणून हंसले. अगदीं लाख माणूस!

**ता. २३ मार्च**

बाळाच्या प्रकृतींत सुधारणा आहे, हट्ट करतो—त्याला आज मोटर आणून दिली. डॉ. वामनराव दोनदां येऊन गेले. किती काळजी त्यांना आपल्या केसची ! उद्यांपासून ऑफिसांत जायला हरकत दिसत नाहीं.

**ता. २४ मार्च**

आजपासून ऑफिसांत जायला सुरुवात केली. बाळाच्या आजारपणाचा माझ्यावरहि इतका परिणाम झाला असेल, अशी कल्पना नव्हती. मीच आजारी होतों कीं काय, अशी इतर सहकाऱ्यांनीं पृच्छा केली.

डॉक्टर रोज दोनदां येऊन जातात. बाळाची प्रकृति आतां पुष्कळच सुधारली आहे. खरं म्हटलं तर आतां डॉक्टरांनीं येण्याची जरूरी दिसत नाहीं. तेवढंच त्यांचं बिल निष्कारण फुगायचं. पण येईनात का! ते आले म्हणजे मालतीला बरं वाटतं आणि बाळाच्या प्रकृतीपुढं पैशाचा काय प्रश्न आहे? डॉक्टरांनींच त्याला जीवदान दिलं, नाहीं का !

बाळानं तिचाकीकरतां हट्ट धरला आहे. त्याला तिचाकी आणून द्यायचं वचन दिलं आहे. उद्यां पगार होतांच पहिलं काम हें केलं पाहिजे. बाळाचा एकहि शब्द आम्हीं खालीं पडूं देणार नाहीं. किती गुणी आहे पोर! डॉक्टरांचे फारच उपकार. आम्हीं कधींच दुसऱ्या डॉक्टरकडे जाणार नाहीं. मरायचं असलं तरी डॉ. वामनरावांच्या हातूनच मरूं.

**ता. १ एप्रिल**

ऑफिसांतून परत येतांना बाळाकरितां तिचाकीचा शोध केला. ह्या लढाईमुळं किती महाग झाल्या आहेत तिचाक्या ! पूर्वीं सहा रुपये कीं काय किंमत होती म्हणे ! आतां २५ रु. झाली आहे. फारच घासाघीस केल्यावर २३॥ ला द्यायला तयार झाला दुकानदार. तरी पण सहा रुपयांच्या वस्तूला २३॥ देणं जिवावरच आलं. पण करणार

काय? राजहट्ट, स्त्रीहट्ट आणि बालहट्ट पुरवलाच पाहिजे असं कायसं एक संस्कृत वचन आहे ना? आणि बाळापेक्षां पैसे थोडेच जास्त आहेत?

घरीं येतों तों डॉक्टरांचं बिल हातांत पडलं. बिल पाहून जरी डोळे फिरले नाहीत, तरी छातींत थोडी धडकीच भरली. बिलाची रक्कम रु. २७५-१२-० एवढी झाली आहे. माझ्यासारख्या मध्यम स्थितींतल्या माणसाला ही रक्कम जरा जडच आहे. पण थोडीथोडी करून फेडलीच पाहिजे.

ता. २ एप्रिल

डॉक्टरांना आज पन्नास रुपये दिले! सवडीप्रमाणं थोडेथोडे द्या, असं डॉक्टर म्हणाले. दर महिन्याला थोडेथोडे करून नक्कीच देईन.

डॉक्टर अजून रोज दोनदां येतात. आतां त्यांनीं यायची कांहींच जरूरी नाहीं. तसं त्यांना मीं व मालतीनं सुचवूनहि पाहिलं. 'पण बाळाची तब्येत अजून अशक्त आहे, आणि त्याला रोज नीट पाहिलं पाहिजे' असं डॉक्टर म्हणाले. 'इंजेक्शनंहि दिलीं पाहिजेत' असंहि ते म्हणाले. इन्जेक्शनं! बाप रे! एकएक इन्जेक्शन म्हणजे निदान चारपांच रुपये! म्हणजे ह्या महिन्याला इन्जेक्शनं आणि व्हिजिट्स मिळून पुन्हां शंभर रुपये बिलांत वाढणार! 'बाळ अशक्त आहे, त्याला इन्जेक्शनं सहन होणार नाहींत,' म्हणून मी सुचवलं. तर डॉक्टर म्हणाले, 'अशक्त माणसांकरतांच हीं शक्ति वाढण्याचीं इन्जेक्शन केलेलीं आहेत. सशक्त माणसांना इन्जेक्शनं द्यायची जरूरी काय?' डॉक्टरांचं म्हणणं तर्कशुद्ध असलं तरी मला तें आवडलं नाहीं. इकडे डॉक्टरांचं बिल फुगतं त्याची वाट काय? अखेरीस डॉक्टरांना इन्जेक्शनं देण्याची परवानगी दिली! हो, डॉक्टरांना नाखूष करून कसं चालेल?.....

**ता. ४ एप्रिल**

आज डॉक्टरांनीं बाळाला एक शक्तीचं इन्जेक्शन दिलं. इन्जेक्शन दिल्यावर बाळ अतिशय रडला, असं मालती सांगते. मी त्या वेळीं ऑफिसांत होतों. खरं म्हणतां, बाळाला इन्जेक्शनं द्यायलाच नकोत. त्याला तीं सहन व्हायचीं नाहींत, ( आणि आमच्या खिशालाहि सहन व्हायचीं नाहींत ! ) पण डॉक्टर म्हणतात तर दिलींच पाहिजेत.

**ता. ६ एप्रिल**

डॉक्टर आतां रोज एकदां येऊन जातात. 'बाळ आतां चांगला हिंडूं फिरूं लागला आहे. त्याला आतां इन्जेक्शनांची काय जरूर ?' म्हणून डॉक्टरांना विचारलं. 'त्याचा आजार उलटूं नये म्हणून काळजी घेतलेली बरी' असं ते म्हणाले. डॉक्टरांनीं अशी भीति घातली म्हणून आम्हीं इन्जेक्शनं पुढं चालू ठेवण्यास संमति दिली. पण डॉक्टरांना आतां रोज येण्याची आवश्यकता नाहीं, असं मात्र त्यांना जरा स्पष्टच कळवलं.

**ता. ८ एप्रिल**

आज डॉक्टर इन्जेक्शन द्यायला आले, तेव्हां मी मुद्दामच घरीं राहिलों. डॉक्टरांनीं बाळाच्या कोमल दंडांत सुई खुपसतांच बाळ किती विवळला ! नंतरहि किती वेळ रडत राहिला ! खरंच, नको तें इंजेक्शन असं वाटलं. डॉक्टरांचा हात बराच जड दिसतोय् ! . . . .

**ता. १५ एप्रिल**

बाळाच्या आजारपणाचा खर्च, डॉक्टरांना दिलेले रु. ५०, ह्यामुळं ह्या महिन्याला बरीच ओढाताण झाली. दर महिन्याला बँकेंत शंभर रुपये शिल्लक टाकण्याची आपली मला संवय आहे. ह्या महिन्याला फक्त पस्तीसच टाकले.

**ता. २६ एप्रिल**

आज सत्यनारायण केला. बाळाच्या आजारपणांत मालतीनं सत्य-

नारायण सांगितला होता. तो केल्यावांचून सुटकाच नाहीं. आमचा लाडका बाळ आजारांतून उठल्याबद्दलचा सत्यनारायण चांगलाच कडाक्यानं केला. शंभर एक रुपये तरी खर्च आला असावा—

ह्या निमित्तानं बाळाला आतां आणखी इंजेक्शनं नकोच असं स्पष्टच डॉक्टरना सांगितलं. आणखी पांचसहा इंजेक्शन देऊन एक कोर्स पुरा करण्याचा डॉक्टरांचा इरादा होता. त्यांना तसं सांगितल्या-वर मनावरचं एक ओझं उतरल्यासारखं वाटतंय्.

ता. २७ एप्रिल

बाळ आजपासून शाळेंत जाऊं लागला. त्याचीं पुस्तकं वगैरे अजून घ्यायचींच आहेत. डॉक्टरांनीं त्याला शक्तीची औषधं वगैरे लिहून दिलीं आहेत, तींहि बाजारांतून आणलीं पाहिजेत. खर्च बराच आहे. खरंच, ह्या दिवसांत आजारपण म्हणजे भलतंच महाग पडतं. डॉक्टरां-चं बिल, इतर औषधं, डॉक्टरकरतां गाडीघोडा, आजारपणांतलीं उपकरणें, म्हणजे मध्यम स्थितींतल्या माणसाला जरा जडच जातं. डॉक्टरांच्या बिलाविषयीं किंवा इतर खर्चाविषयीं मी कांहीं कुरकुर करतोंय् अशांतला भाग नाहीं. पण आला मनांत विचार तो लिहून ठेवला.

ता. १ मे

सकाळीं उठतो तों डॉक्टरांचा माणूस आपला बिल घेऊन तयार. रागच आला त्या माणसाचा!

डॉक्टरांचं बिल पुन्हां फुगलंय्. गेल्या महिन्याला रु. ५० दिले तरी अजून रु. २८३–५–० बिल शिल्लक आहेच. बाळाचं आजारपण गंभीर स्वरुपाचं होतं खरं, पण त्याकरितां सुद्धां एवढं बिल म्हणजे जरा अधिकच होतं, नाहीं का? आतां देईन म्हणा मी थोडंथोडं करून सर्व.

ह्या महिन्याला कायकाय खर्च आहे, तें पाहिलं पाहिजे आणि

त्याप्रमाणं डॉक्टरांच्या बिलाचा हप्ता दिला पाहिजे. किराणा रु. ५०, बाळाचीं पुस्तकं रु. २०, शाळा फी रु. २-८-०, औषधं अंदाजीं रु. २०, बँकेंत ठेवायचे रु. १००...डॉक्टरांना द्यायला फक्त रु. २० च राहतात. पाहूं पुढं डॉक्टरांना काय द्यायचं तें !

ता. ५ मे

मालतीला बाळाच्या आजारपणांत बराच त्रास झाला. तिच्याकरतां मी कांहींच केलं नाहीं. तिला पेठ्यांच्या दुकानांतलं एक पातळ आवडलेलं आहे. कधींचं घ्यायचं म्हणते, पण मीच पुढं ढकलीत होतों. त्यांतच बाळहि आजारी पडला. पण आतां तिला तें घेऊन दिलंच पाहिजे. उद्यां ऑफिसांतून येतांना तिच्या नकळतच घेऊन यावं आणि तिला चकित करून सोडावं. पातळ आणलेलं पाहून किती आनंद होईल तिला !

पण हें पातळ घेतलं तर डॉक्टरांचं बिल ? पाहूं पुढं. मालतीची एवढी हौस तरी पुरी केलीच पाहिजे. डॉक्टरांना काय कमी आहे? ..

ता. ६ मे

आज ऑफिसांतून घरीं येतांना मालतीला पातळ आणलं. मीं अगदींच अनपेक्षितरीत्या पातळ आणलेलं पाहून किती आनंद झाला तिला ! दुकानांत एक छानसं कोटाचं कापड दिसलं, म्हणून तें बाळाकरतां आणलं. फारच सुरेख आहे कापड, आणि त्या मानानं किंमतहि कांहीं जास्त नाही.

ता. ७ मे

ऑफिसांतून येतांना माझ्याकरतांहि एका कोटाचें कापड घेऊन आलों. माझ्याकरतांहि कां आणलं नाहीं म्हणून काल मालती रागावली होती. सध्यां मला कोटाची विशेषशी जरूरी नव्हती. पण म्हटलं, मग कदाचित् असलं सुंदर कापड मिळायचं नाहीं म्हणून घेऊन ठेवलं.

जिवाची एवढी हौस पुरवायची नाहीं तर मग पैसे मिळवायचे तरी कशाला?..

कोटाच्या कापडाला 'मॅचिंग' असा एक टाय दिसला तोहि घेतला. तो कोट आणि टाय मोठा झकास दिसेल, नाहीं! एकंदर खर्च रु. ४०–१२–३.

डॉक्टरांचा माणूस बिलाकरितां आला होता. आमच्या परिस्थितीची डॉक्टरांना काय कल्पना? दोनतीन दिवसांत पैसे देतों, असं सांगून त्याला वाटेला लावला.

ता. १० मे

सकाळ होतांच डॉक्टरांचा माणूस बिलवसुलीकरतां हजर! 'एवढा तगादा काय लावला?' म्हणून विचारलं, तर म्हणे, 'दोनतीन दिवसांनंतर तुम्हीच यायला सांगितलं होतं ना?' म्हणून कटकट नको म्हणून रु. ५० त्याच्या हातावर ठेवले.

ता. १६ मे

डॉक्टरांच्या सल्ल्यावरून मालतीला व बाळाला हवाफेराकरितां तिच्या माहेरीं पाठवून दिलं. मला आतां खाणावळींत जेवावं लागणार. दोन ठिकाणीं माणसं पांगल्यामुळं खर्चेहि वाढणार....

ता. २५ मे

मालतीचं पत्र आलंय्. बाळ सुखरूप आहे. तिच्या धाकट्या बहिणीच्या लग्नाचं घाटतंय् म्हणे....

ता. २७ मे

जून ४ ला शकूचं लग्न नक्की झालंय्. मला गेलंच पाहिजे. अहेर आमच्या इतमामाला साजेल असाच पाहिजे, असा राणीसरकारचा हुकूम आलाय्. तो कसा मोडतां येईल?

ता. १ जून

पगार हातांत पडतांच तरटे ताटकर कंपनींतून हिऱ्यांची आंगठी आणली. ओळखीमुळं जरा स्वस्तांतच पडली. किंमत रु. २२५.

ता. ६ जून

शकूच्या लग्नाहून परत आलों. आंगठी पाहून सर्वांचेच डोळे दिपले. सर्वांनीं मला वरवर केलं. लग्नांत नेसण्याकरितां म्हणून मालतीनं ऐन वेळेला एक शालू घेतला. फारच खुलून दिसला तिला तो. किंमत रु. १७५.

...केव्हां केव्हां वाटतं हा उगाच खर्च झाला. पण शालू घेतला तो कायम घरींच राहणार. शकूला आंगठी दिली. पण त्याबदलो आम्ही सर्वांचं प्रेम संपादन केलं....

ता. ८ जून

आज रविवार. आज सकाळीं डॉक्टरांच्या माणसानं गांठलंच. मी तर डॉक्टरांच्या बिलाविषयी सारं विसरूनच गेलों होतों. ह्या महिन्यांत अडचण असल्यामुळं थोडं थांबा म्हणून सांगितलं. तेव्हां तो गेला.

डॉक्टरांच्या बिलांतले अजून रु. २३३–५–० आमचे बाकी आहेत.

ता. १५ जून

डॉक्टरांना पैशाची निकड आहे, तरी पैसे द्या, म्हणून त्यांचा माणूस आला. 'मीच येऊन आज भेटेन म्हणून सांग,' असं सांगून त्याला वाटेला लावला.

संध्याकाळीं डॉक्टरांना जाऊन भेटलों. आमच्यांत संवाद झाला—

"काय? बिल द्यायला आलांत?" डॉक्टरांनीं जरा खुषींत येऊन विचारलं.

"अं ? ... पण जरा बिलाविषयीं बोलायचं आहे."—मी.

"काय ?"

"बिल जरा जास्तच झालंय् !"

"बिल अगदीं बरोबर आहे. एक पैसुद्धां जास्त नाहीं लावलेली."

"तें खरं हो. तुमचे आमच्यावर फारच उपकार आहेत. ह्याच्या दुप्पटसुद्धां तुम्हांला द्यायला हरकत नाहीं..."

"दुप्पट नको. योग्य आहे तेवढंच द्या."

"पण आमची परिस्थिति पहा. महागाई ही अशी. त्यांतच आमच्या मेव्हणीचं लग्न झालं..."

"मग तुमचं म्हणणं काय !"

"फार कांहीं नाहीं. एवढे वरचे तेहतीस रुपये पांच आणे कमी करा."

"एवढे ?"

"आतां नाहीं म्हणूं नका. तुमच्यावर आमची श्रद्धा आहे. सर्वांना आम्हीं सांगतों, कीं तुमच्या हाताला फारच चांगला गुण आहे..."

"पण तुम्ही फारच कमी करायला सांगतां !"

"तो भणग्यांचा मुलगा आला होता ना काल औषधाला? आम्हींच पाठवला होता त्याला..."

"बरं, करा कमी. फाडूं पावती ?"

"तसं नाहीं; आतां नाहीं आणले मी पैसे बरोबर. पण एक तारखेला देऊन टाकतों."

मग डॉक्टरांची रजा घेऊन मी परत आलों. चला, ह्या महिन्याला रु. ३३-५-० तर डॉक्टरांना दिल्यासारखे झाले. आतां उरले रु. २००.

**ता. १ जुलै**

डॉक्टरांच्या माणसाचा ससेमिरा असह्य होऊं लागला आहे. एक

तारीख उजाडली नाहीं तर आपला पठाणासारखा दारांत उभा. जसं कांहीं डॉक्टरांचं बिल मीं बुडवणारच आहें! डॉक्टरांचे रु. २०० राहयलेत, त्यांतली एक पैहि बुडवण्याची माझी इच्छा नाहीं. पण सवडीप्रमाणं थोडेथोडे देईन. आम्हांला काय इतर खर्च नाहींत? आणि आमच्या पाठीशींच एवढा तगादा लावायला काय डॉक्टरांना इतर पेशंट नाहींत? पैशाचा एवढा लोभ डॉक्टरांनीं दाखवायला नको!

त्याला आठ तारखेला यायला सांगितलंय्. तोंपर्यंत पैशाची कांहीं तरी तरतूद केली पाहिजे.

### ता. ८ जुलै

बाळाची मुंज करावी, असं सासूबाईंचं पत्र आलंय्. ह्या दिवसांत एखादं कार्य काढायचं म्हणजे अवाच्या सवा खर्च ठरलेलाच. त्यांतून बाळाची मुंज म्हणजे हात आखडता घेऊन कसं चालेल!

डॉक्टरांच्या माणसाजवळ डायरी आहे कीं काय, कोण जाणे! अगदीं सांगितल्या तारखेला न चुकतां हजर राहतो. ह्या साऱ्या गडबडींत डॉक्टरांचं बिल तर मी विसरून गेलों होतों. ह्या महिन्याला रु. ५० देणार होतों, पण बाळाची मुंज काढल्यावर कशी सवड होणार? पुढल्या महिन्याला देईन म्हणून त्याला परत लावला.

### ता. २५ जुलै

बाळाची मुंज कडाक्यानं झाली. खर्च खूप झाला, पण अहेरहि बराच मिळाला.

....गोष्ट क्षुल्लक आहे, पण त्यावरून माणसाच्या मनोवृत्तीवर प्रकाश पडतो म्हणून तिची इथं नोंद करतों. डॉक्टर मुंजीच्या पानसुपारीला आले. आम्हीं त्यांना वरवर केलं, आणि पानसुपारी घेऊन ते चालते झाले. बाळाला दमडीचासुद्धां अहेर केला नाहीं त्यांनीं!

म्हणजे आम्हांला कांहीं त्यांच्याकडून अपेक्षा होती, अशांतला भाग नाहीं. पण डॉक्टरांना आम्हीं आमच्या घरचेच समजतों, आणि त्यांनीं असं वागावं, ह्याविषयीं मंडपांत बरीच टीका झाली.

**ता. १ ऑगस्ट**

आज एक तारीख. डॉक्टरांचा माणूस आलाच. आतां मात्र हा प्रकार संतापजनक होऊं लागला आहे. डॉक्टरांनीं आमच्याकडे एवढा तगादा लावावा, ह्याचा अर्थ काय? डॉक्टर काय आम्हांला कुणी लफंगे समजतात कीं काय? आमची काय येवढीहि दानत नाही?—गांवांत काय दुसरे चांगले अनुभवी डॉक्टर थोडे पडले होते? पण म्हटलं, तरुण मुलगा आहे, त्याच्या वडिलांशी आमची जुनी ओळख, म्हणून त्याच्याकडून औषधोपचार केले. तर तोच असा बोकांडीं बसला! रु. ५० दिले. नाहींतर ह्या महिन्याला कांही स्वस्थता नसती. मिळूं दिली त्याच्या माणसानं!....

**ता. १ सप्टेंबर**

हें आहे तरी काय? एक तारीख उजाडली न उजाडली कीं आपला डॉक्टरांचा माणूस हजर! जसं कांहीं मी महिनाभर मरेमरेतों काम करतों, तें डॉक्टरांना पैसे मिळावेत म्हणनच! तसंच पाहिलं तर बाळाचं आजारपण कांहीं गंभीर स्वरूपाचं नव्हतं. डॉक्टरांनीं बिलहि अवाच्या सवा केलं. न बोलवतां व्हिजिटला यायची काय जरूर होती त्यांना? आणि तीं इन्जेक्शनं तर अगदीच निष्कारण दिली. आपल्याला पैसे मिळावे म्हणून हे डॉक्टरलोक पेशंटांना इन्जेक्शनं देतात. त्याकरतां पेशंटांच्या शरिराला भोकें पाडायला त्यांना कांही वाटत नाहीं. परवांच भडभड्यांच्या राजाच्या पोटांत अशीच कळ उठली होती. वैद्याच्या नुसत्या एका मात्रेनं ती बरी झाली. खर्च काय आला तर आठ आणे! आणि त्याच रोगाला आमच्या डॉक्टरांचं बिल काय तर

रु. ३३३–५–० ! निव्वळ लूट चालवलीय् ह्या डॉ. वामनरावानं ! पैसे देणारा दिसला तरी त्याच्याकडून आपण किती पैसे उकळावेत, ह्याला कांहीं सुमार !

दिले त्याला रु. २५ !

**ता. ३ सप्टेंबर**

सकाळीं बाळाच्या पोटांत थोडं दुखूं लागलं. मालती म्हणाली, डॉक्टरांना बोलवूं या. मीं नको म्हटलं आणि बाळाला एरंडेल दिलं. आपली काळजी घेतलेली बरी म्हणून वैद्याकडून मात्रा आणून दिली. संध्याकाळपर्यंत बाळ खडखडीत बरा झाला. फुकट वामनरावाला दहा पंधरा रुपये गेले असते !

वैद्याकडे जातांना भगवंतराव भेटले. 'डॉ. वामनरावांचं औषध न घेतां वैद्याकडे कां जातां ?' म्हणून त्यांनीं प्रश्न केला. "डॉक्टर वामनराव अगदीं बेअकली गृहस्थ आहे—त्याला डॉक्टरकींतलं कांहीं समजत नाहीं," असं सांगितलं.

**ता. ४ सप्टेंबर**

डॉक्टरांचा माणूस आज पुन्हां आला. डॉक्टरांना पैशाची जरूर आहे, तरी आणखी पैसे द्या म्हणून म्हणाला. डॉक्टरांच्या ह्या थापा काय, मला कळत नाहींत ? म्हणे डॉक्टरांना पैशाची जरूरी आहे ! जरूर असत नाहीं कुणाला ? आतां मी डॉक्टरांना एक पैहि देणार नाहीं ! नुसत्या रंगीबेरंगी पाण्याच्या बाटल्या भरून दिल्या, इन्जेक्शनं देऊन माझ्या बाळाचे हाल केले, आणि वर आमच्याकडे व्हिजिटला आले असतां चहा चापला, एवढ्याकरतां त्या वामन्याला मीं दिले ते रु. २०८–५–० ही रक्कम फार झाली. त्या माणसाला ी हुसकनच लावला.

हा डॉ. वामनराव अत्यंत लोभी माणूस दिसतोय्. डॉक्टर होण्याला

तर माणूस अगदींच नालायक दिसतो. वैद्यकीचं ज्ञानहि त्याला यथा-तथाच आहे. त्याचा सारा डोळा पेशंटाच्या तिजोरीवर. पैसे उकळण्या-करतां नाना क्लृप्त्या काढण्यांत मात्र हुशार आहे तो.

अशा डॉक्टरकडे प्राण गेला तरी जाऊं नये !

---

# ६. गाडलेलीं भुतें

"श्रीकृष्णा, तूं माझा मित्र, तत्त्वज्ञानी आणि मार्गदर्शक आहेस!" मी गंगूनानांना म्हणालों.

"धनुर्धरा पार्था, आतां आणखी काय नवीन भानगड करून ठेवलीस?" टेबलावर विड्यांचं बंडल होतं, पण त्याकडे गंगूनानांनीं दुर्लक्ष केलं. टेबलाच्या खणांतून त्यांनीं पिवळ्या हत्तीचं एक पाकीट काढलं. त्यांतली एक सिगरेट शिलगावून ती त्यांनी तर्जनी आणि मधलं बोट ह्यांच्यामधें धरली. मग बंद केलेल्या मुठींतून एक फर्मास झुरका मारून ते मला म्हणाले, "काय नवीन लचांड आहे?"

"फारच भयंकर आहे हें प्रकरण!" मी म्हणालों. "गंगूनाना, ह्या पेंचप्रसंगांतून तुम्हीं जर मला सोडवलं नाहीं—"

"तर काय होईल?"

"मेरी जिंदगी बरबाद हो जायगी!"

"हा एक त्रासच झालाय मला तुमच्या भानगडी निस्तरायचा." त्रासल्यासारखं दाखवून गंगूनाना म्हणाले खरे. परंतु त्यांचे ते बारीक मिस्किल डोळे आनंदानं लुकलुकत असलेले मला स्पष्ट दिसत होते. त्यांनीं आरामखुर्चीत आपला बुटका, तुंदिल देह ऐसपैस पसरून दिला आणि ते म्हणाले, "ठीक आहे, वत्सा, सांग सारी हकीकत. आतांपर्यंतच्या आपल्या कीर्तीला जागून ह्यांतून—" आपल्या फकिराच्या कवटीसारख्या डोक्यावर टिचक्या मारीत गंगूनाना म्हणाले, "जर कांहीं शक्कल निघाली तर पाहूं. निदान, गोष्टी सांगेन युक्तिच्या चार."

" तुम्हांला सुलू माहीतच आहे !" मी म्हणालों.

" कोण सुलू? माझं हें डोकं म्हणजे छोटा ज्ञानकोश असला, तरी ही सुलू मला माहीत असण्याचा कांहींच संभव नाहीं!" गंगूनाना म्हणाले.

" सुलू ही रावबहाद्दुर ढेकणे ह्यांची कन्या आहे. ह्या दोनतीन महिन्यांपासूनच माझी नि तिची ओळख झाली आहे. सुलू !—किती गोड छोकरी आहे ती!" मी म्हणालों.

सुलूचं थोडं वर्णन करण्याचा माझा विचार होता, पण गंगूनाना मध्येंच म्हणाले, " कळलं ! तुमची ती सुलू जगांतल्या सर्व मुलींत सुंदर आहे; ती सद्गुणांची पुतळी आहे, थोडक्यांत ती एक देवता आहे आणि तुमचं तिच्यावर प्रेम आहे! होय ना?"

" हूं !" मी जरा हिरमुसला होऊन म्हणालों.

" मला फक्त मुद्दे तेवढे सांगा." गंगूनाना म्हणाले, " तुम्ही लेखक आहांत आणि तुम्हां लेखकांना कुठलीहि गोष्ट फुलवून सांगायची हौस असते. पण मला भाषेचा फुलोरा नको आहे. मला नागवं सत्य सांगा."

" हूं !-थोडक्यांत सांगायचं म्हणजे असं कीं आमची प्रेमाची नौका ह्या रावबहाद्दुररूपी खडकावर—"

" उपमाहि नकोत !" गंगूनाना म्हणाले.

" आमचं एकमेकांवर प्रेम आहे." मी म्हणालों, " आम्हीं लग्न करायचंहि ठरवलं होतं, पण—"

" पण काय? भांडण वगैरे झालं का?"

" भांडणबिंडण कांहीं नाहीं. आमच्या लग्नाला रावबहाद्दुरांची मान्यता नाहीं!"

" कां?"

" तेंच तर कळत नाहीं?" मी म्हणालों, " एक दिवस त्यांना

भेटण्याकरितां म्हणून सुलूनं मला घरीं बोलावलं, पण काय झालं कुणास ठाऊक! मला पाहातांक्षणापासूनच त्यांचा माझ्याविषयीं वाईट ग्रह झालेला आहे."

"कां?"

"कारणच तर कळत नाहीं. मला पाहिलं कीं ते गुरगुरूं लागतात. आपले वडील असं कां वागतात, हें सुलूलाहि कळत नाहीं. कारण जर मला कळलं असतं, तर मीं तें दूर करण्याचा प्रयत्न केला असता. मग मला तुमच्याकडे यायचंहि कारण पडलं नसतं!"

"रावबहाद्दुरांचा तुमच्याविषयीं दुराग्रह आहे, ह्याला कांहींतरी कारण आहे, हें निश्चित!" गंगूनाना गंभीरपणानं म्हणाले.

"हें खूपच सांगितलं तुम्हीं!" मीं टोमणा मारला.

"हूं!" असा एक हुंकार देऊन गंगूनाना आपल्या खुर्चीवरचे उठले. त्यांनीं आपले हात पाठीशीं एकमेकांत गुंतविले आणि ते खोलीं-तल्या खोलींत जोरजोरानं येरझाऱ्या घालूं लागले. मग ते म्हणाले, "आणखी कांहीं माहिती सांगण्यासारखी आहे?"

"तशी विशेष कांहीं नाहीं!" मी आठवण करीत म्हणालों. "सांगण्यासारखं म्हटलंच तर येवढं सांगतां येईल, रावबहाद्दुरांना वाचनाचा मुळींच नाद नाहीं. तरीपण माझ्या पांचसहा महिन्यांपूर्वीं प्रसिद्ध झालेल्या 'गाडलेलीं भुतें' ह्या कादंबरीचीं त्यांनीं बरींच पारायणं केल्याचं सुलू सांगत होती."

"गाडलेलीं भुतें!" ती तुमची टुक्कार कादंबरी? बळवंतराव, तुम्हीं माझा सल्ला घ्या—असल्या भिकार कादंबऱ्या तुम्हीं खरडूं नका!" गंगूनाना म्हणाले.

"पण आतांचा विषय तो नाहीं!" मी म्हणालों, "प्रश्न

असा आहे, कीं आमच्या लग्नाला रावबहाद्दुरांची संमति कशी मिळवायची ? ”

गंगूनानांनीं माझ्या बोलण्याकडे लक्ष नाहीं असं दाखवलं आणि त्यांनीं आपल्या येरझाऱ्या पुन्हां सुरू केल्या. मग मधेंच थांबून ते म्हणाले, “ रावबहाद्दुरांची काय माहिती आहे तुम्हांला ? ”

“ ते सुलूचे वडील आहेत, ते तिचे वडील म्हणून शोभत नाहींत, त्यांचा चेहरा उग्र आहे, त्यांना भलेगच्च मिशा आहेत, त्यांनीं पेन्शन घेतलेलं आहे, ते एक सुखवस्तु संसारी गृहस्थ आहेत आणि त्यांना मी आपला जामात व्हायला नको आहे. एवढीच मला त्यांच्याविषयीं माहिती आहे ! ”

गंगूनानांनीं आपल्या येरझाऱ्या चालूच ठेवल्या. मग ते मला म्हणाले, “ तुमची ती कादंबरी मला केव्हांतरी आणून द्या. ”

“ कशाला ? ” मी विचारलं.

“ त्या पुस्तकाचा केराच्या टोपलींत टाकण्यापुरताच उपयोग करायचा असला तरी तें मी वाचणार आहें ! ” मग पुन्हां एकदां दोनचार येरझाऱ्या घालून ते म्हणाले, “ आतां तुम्ही जाऊं शकतां ! ”

गंगूनानांकडून मी घरीं जावयास निघालों तेव्हां माझ्या मनाला उमेद वाटत नव्हती. गंगूनानांनीं मला अनेक अडचणींतून मार्ग दाखवला असला, तरी ह्या बाबतींत गंगूनानांचं तें सामर्थ्यहि अपुरं पडेल अशी मला भीति वाटत होती. गंगूनाना किती झाले तरी माणूसच होते आणि रावबहाद्दुरांसारख्या विक्षिप्त, रागीट, हेकेखोर माणसाचं मन वळवणं ही देवांनाहि सहसा न साधणारी गोष्ट होती.

गंगूनानासारखा गोष्ट सविस्तर ऐकण्याचा तुम्हांला कंटाळा नसेल तर सांगतों. माझी अशी कल्पना आहे कीं सारा प्रकार खुलासेवार सांगितल्याशिवाय माझ्या अडचणींची, आशानिराशांची तुम्हांला नीट कल्पना यायची नाहीं. म्हणून थोडा पूर्वेतिहास सांगतों.

एकदां मुंबईहून येतांना—साधारण तीनचार महिन्यांपूर्वीची गोष्ट आहे ही—आगगाडींत सुलूची आणि माझी ओळख झाली. मी लेखक आहें, हें कळतांच तिला आनंद झाला. माझ्या गोष्टी, कादंबऱ्या ती आवडीनं वाचत असे हें ऐकून मलाहि आनंद झाला. आमचं उतरण्याचं स्टेशन येण्यापूर्वीं आम्ही पुष्कळ दिवसांचे ओळखीचे आहोंत, असं आम्हांला वाटूं लागलं. थोडक्यांत सांगायचं म्हणजे, मुंबईपासूनचा आमच्या गांवच्या स्टेशनापर्यंतचा प्रवास आम्हीं आगगाडीतून न करतां विमानांतून केला, असं आम्हांला वाटलं.

नंतर कांही ना कांहीं निमित्तानं मी तिच्या भेटी घेऊं लागलों. माझ्या भेटीकरितां तीहि उत्सुक असलेली दिसली. साधारण महिन्या-भरांत आमची ओळख नुसती ओळखच राहिली नाहीं. तिचं प्रेमांत रूपांतर झालं होतं.

साधारण दीड महिना गेल्यावर तिच्यावांचून जगतां येणं अशक्य आहे, असं मला समजून आलं. मला जिवंत राहायचं असेल, तर सुलूशीं विवाहरज्जूंनीं बद्ध झाल्याखेरीज उपाय नाहीं, ह्याची मला दिवसें-दिवस जाणीव होऊं लागली होती. म्हणून एक दिवस मी तिला म्हणालों, "सुलू, तूं माझी होशील का?"

ती येवढ्या पटकन् होकार देईल अशी मला कल्पना नव्हती. मी असं विचारीन अशी तिलाहि कल्पना नव्हती. माझ्यासारखा बडा लेखक तिला आपण होऊन लग्नाची मागणी घालील हें तिला अशक्य वाटत होतं! तिच्यासारखी देवता माझ्यासारख्या यःकश्चित् मर्त्य मानवाबरोबर विवाहास तयार होईल, हें मलाहि अशक्य वाटत होतं.

थोडा वेळ माझ्या बाहुपाशांत राहून आणि माझ्या छातीवर डोकं घुसळून झाल्यावर सुलू म्हणाली, "मी तयारच आहें; पण रावबहा-

" मग विचार ना तूं " मी म्हणालों.

" विचारीन. बाबा ' नाहीं ' नाहीं म्हणायचे, पण तुम्ही एकदां आमच्या घरीं या—"

" कशाला ? रावबहाद्दुरांनीं पाहायला ?"

" मग ? आपला जांवई कसा आहे, हें पाहायला नको का त्यांनीं ? तुमची त्यांच्याशीं ओळख करून देईन आणि तेहि आनंदानं संमति देतील आपल्या लग्नाला.

सुलूसारख्या बड्या रावबहाद्दुरांच्या सुंदर, सुशिक्षित आणि सर्व-गुणसंपन्न मुलीशीं लग्न करणं ही गोष्ट येवढी सोपी असेल अशी माझी कल्पना नव्हती. मी विचारलं, " कशावरून म्हणतेस रावबहाद्दुर संमति देतील म्हणून ?"

" त्यांना तुमची कादंबरी फार आवडली."

" कुठली कादंबरी ?"

" गाडलेलीं भुतें !"

" होय ? खरंच ?"

" सारखी महिनाभर वाचीत होते ते. पा यणं केलीं त्यांनीं त्या कादंबरीची."

" इतका वाचनाचा नाद आहे रावबहाद्दुरांना ?"

" वाचनाचा नाद !" मोठ्यानं हंसून सुलू म्हणाली, " छट्, मुळींच नाहीं. कादंबऱ्या–गोष्टी वाचणं हा वेळेचा अपव्यय आहे असं त्यांचं म्हणणं आहे. आम्हांला कादंबऱ्या वाचायच्या त्या चोरून वाचाव्या लागतात !"

" मग माझी कादंबरीच कां वाचली त्यांनीं ?"

" त्यांना कुणीसं सांगितलं म्हणे ती वाचाच म्हणून. मग त्यांनीं ती कादंबरी विकत आणली दुकानांतून आणि [illegible]

काढली त्यांनीं. इतके तल्लीन व्हायचे ते कादंबरी वाचतांना कीं ते वाचत असतांना कुणीं त्यांच्याशीं नुसतं बोललं तरी ते वसकन् अंगावर यायचे."

"अरे वा! मग बरंच सोपं दिसतंय त्यांची परवानगी मागायचं काम!" मी आनंदून म्हणालों. त्या वेळीं माझ्या डोळ्यांसमोर बोहलं दिसत होतं आणि कावांना भटजींनीं कर्णमधुर आवाजांत म्हटलेलीं मंगलाष्टकं ऐकूं येत होतीं.

"याच तुम्ही. आपणाला आवडलेल्या कादंबरीचे लेखक तुम्हीच आहांत म्हणून त्यांना कळलं कीं त्यांना फार आनंद होईल. मग पुढचं काम करणं फारच सोपं जाईल." सुलू म्हणाली.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं ठरल्याप्रमाणं जामानिमा करून आमची स्वारी रावबहाद्दुरांच्या बंगल्यावर उपस्थित झाली. दरवाज्यांतच वाट पाहत असलेल्या सुलूनं आपल्या जिवणींतील कुंदकळ्यांचं दर्शन घडवून माझं यथोचित स्वागत केलं. मग ती मला रावबहाद्दुरांकडे घेऊन गेली.

"बाबा, हें पाहिलंत का कोण आलंय् तुम्हांला भेटायला?" रावबहाद्दुर दिवाणखान्यांत बसले होते, त्यांच्या समोर मला घेऊन जाऊन सुलू लाडिक आवाजांत म्हणाली.

"होय का? कोण आहेत?" वर्तमानपत्रांतून डोकं बाहेर काढून रावबहाद्दुरांनीं विचारलं.

क्षणभर मला वाटलं, रावबहाद्दुरांचं तोंड वर्तमानपत्राच्या आड होतं, तेंच ठीक होतं. बापरे! काय तो त्यांचा उग्र चेहरा! आणि त्यांच्या त्या छटाकछटाक मिशा? आठवण झाली कीं अजूनहि मला भीति वाटते. क्षणभर मला भास झाला, रावबहाद्दुर हे सौंदर्यवती सुलूचे वडील नसावेत. हा एक राक्षस आहे आणि त्यानं ही सुस्वरूप

राजकन्या कुठून तरी पळवून आणून तिला आपल्या किल्ल्यांत बंदिस्त करून ठेवली आहे !

"ओळखा पाहूं?" सुलू म्हणाली.

"कसं ओळखूं ?" रावबहाद्दुर आपल्या घोगऱ्या आवाजांत म्हणाले.

"ओळखा. तुम्हांला माहिती आहे त्यांची."

"मला माहिती आहे ?"

"होय, त्यांचं नांव ऐकलं कीं आनंद होईल तुम्हांला."

"खरं ?"

"होय."

"मग सांग ना त्यांचं नांव-"

"हे बळवंतराव देशपांडे—"

"बळवंतराव देशपांडे !" एकदम दचकून रावबहाद्दुर म्हणाले, आणि त्यांचा चेहरा पार बदलून गेला. मघां आपल्या कन्येशी बोलतांना त्याच्या उग्र चेहऱ्यावर थोडीशी मार्दवाची छटा दिसून येत होती ती आतां समूळ नाहींशी झाली होती. त्यांचा चेहरा आतां एखाद्या हिंस्र लांडग्याच्या चेहऱ्यासारखा दिसू लागला होता. एक-दोनदां माझं नांव ते स्वतःशींच पुटपुटले. मग एकदम माझा थरकांप उडवणाऱ्या स्वरांत ते म्हणाले, "बळवंतराव देशपांडे ! म्हणजे 'गाडलेली भुतें' ह्या कादंबरीचे लेखक ! होय ना ?"

"होय बाबा." लाडिकपणानं सुलू म्हणाली, "तुम्हांला फार आवडली होती ना ह्यांची कादंबरी ? कितीदां तरी वाचून काढलीत तुम्हीं ती. फारच छान लिहितात हे, नाही ? "

"भिकार लिहितात हे अगदीं ! " मला वाटलं, आकाशांतला एखादा काळाकुट्ट ढग रावबहाद्दुरांच्या दिवाणखान्यांत उतरला आहे. आणि तिथं तो गडगडाट करत आहे. "गाडलेलीं भुतं ! हूंः !—

बळवंतराव देशपांडे ! हूं:! अगदीं टुकार लिहितात हे! हूं: ! ..हूं: ! गाडलेलीं भुतं ! हूं: ! "

माणसाला आनंद झाला तर तो मला ओळखूं येतो. सुलू म्हणाली होती, माझ्या भेटीनं रावबहाद्दुरांना आनंद होईल म्हणून. पण राव-बहाद्दुरांच्या ह्या गडगडाटांत आणि ' हूं:! हूं:! ' मधे मला आनंदाचं बारीकसं लक्षणदेखील दिसून येत नव्हत. रावबहाद्दुर कितीहि उग्र असले तरी आनंद व्यक्त करण्याची त्यांची ती तऱ्हा नव्हती हें खास! त्यांनीं मला साधं ' बसा ' म्हणूनहि म्हटलं नाही. मग सुलूनंच मला एका खुर्चीवर बसायला सांगितलं. माझं नांव कानावर पडतांच ' हूं:! हूं: ! ' ची सरबत्ती करण्याएवढं रावबहाद्दुराना काय झालं असेल हें मला कळेना.

" मी चहा ठेवते. तवर हे ज्या कामाकरितां आले आहेत, तें काम ते तुम्हांला सांगतील. " असं रावबहाद्दुरांना सांगून सुलू आंत निघून गेली.

ती निघून जातांच रावबहाद्दुरांनीं माझ्याकडे करड्या नजरेनं पाहिलं. मला खाऊं का गिळूं असा भाव त्यांच्या दृष्टींत होता. तोंडावर हंसूं आणून त्यांच्याकडे पाहण्याचा केंविलवाणा प्रयत्न करीत मी बसलों होतों.

" काय काम आहे आपलं ? " रावबहाद्दुर गरजले.

" अं ? क-क-काम म्हणजे— " माझ्या तोंडून शब्द सरळ व्याकरणशुद्ध पद्धतीनं बाहेर पडणंच शक्य नव्हतं. डोक्यांत गोंधळ माजला होता. मनांत भीति वाटत होती. त्यांतच आपण रावबहाद्दुरांच्या कानांवर जें घालण्याकरितां आलों आहोंत, तें ह्या वादळी हवेंत त्यांच्या कानांवर घालून कांहीं उपयोग होईल का, अशी शंकाहि मनाला

वाटत होती. साहजिकच त–त–प–प करत मी बोलूं लागलों, " त–त–तसं– क–क– काम– मं– – म्हणजे— "

" लिहिण्याप्रमाणंच तुम्हांला बोलतांहि येत नाहीं! " रावबहाद्दुरांनीं विकट हास्य करून शेरा मारला.

" न–न– नाहीं! तसं क– क्काम कांहीं नाहीं! " मनाच्या सर्व शक्ति केंद्रित करून मी म्हणालों.

" आणि माझ्याकडे तसं तुमचं कांहीं काम असूनहि उपयोग नाही! " रावबहाद्दुर म्हणाले, " माझ्याकडे तुम्ही सुतळीचा तोडा मागितला तरी तो तुम्हांला मिळणार नाही. हूं! गाडलेलीं भुतं! "

त्यानंतर रावबहाद्दुरांनी जणू माझं तोंडहि पाहणं नको, म्हणून वर्तमानपत्रांत आपलं डोकं खुपसलं. वर्तमानपत्राचे मलाहि मोठे उपकार वाटले. वर्तमानपत्राच्यावरून रावबहाद्दुरांचे डोक्यावरचे भुरके, करडे, जाडजाड केस दिसत होते. माझा थरकांप उडविण्यास तेवढेंहि पुरें होतें. आतां सुलू केव्हां येते आणि इथून केव्हां एकदां सुटका होते ह्याची वाट पाहत, मी चुळबुळ करीत खुर्चीत बसून होतों.

राहूनराहून मला रावबहाद्दुरांच्या वागणुकीचं आश्चर्य वाटत होतं. माझं नांव ऐकतांच ते एवढे एकदम रागवावेत कां, हेंच मला कळेना. त्यांना तर मीं कधीं जन्मांत पाहिलंहि नव्हतं. सुलूशीं ओळख झाल्यापासूनच ह्या जगांत रावबहाद्दुर ढेकणे ह्या नांवाची एक व्यक्ति अस्तित्वांत आहे हें मला कळलं होतं. कधीं कृतीनं, वाचेनं किंवा विचारानंदेखील मीं त्यांचा कांहीं अपराध केलेला मला स्मरत नव्हता. बरं, दिसायलाहि मी ठीक होतों. पाहतांक्षणींच माझ्याविषयीं तिरस्कार वाटावा, असं माझ्या रूपांत तरी कांहीं नव्हतं. हो, नाहींतर सुलूनं तरी मला कशाला पसंत केला असता? मग–रावबहाद्दुर

पहिल्याच भेटींत माझ्यावर एकदम येवढे घुस्सा कां व्हावेत? का राव-बहाद्दुरच चक्कर आहेत ?"

अखेरीस सुलू एकदाची चहा घेऊन आली आणि मला हायसं वाटलं. एखाद्या पार्श्वसंगीत नसलेल्या मूक चित्रपटाप्रमाणंच चहाचा समारंभ आटोपला. फक्त सुलू मला मधूनमधून प्रश्नार्थक खुणा करी,–मी राव-बहाद्दुरांना विचारलं का, हें जाणण्याविषयीं ती उत्सुक होती–आणि मी माझी मान क्षितिजसमांतर रेषेंत हालवी. येवढंच काय तें 'बोलणं' झालं. अखेरीस मी जावयास उठलों, तेव्हां सुलूनं मोठ्यानं विचारलं, "झालं का काम ?"

"कसलं काम" रावबहादुर गुरगुरले, "त्यांचं माझ्याशीं कांहींच काम नव्हतं !"

"वा:! एक काम होतं म्हणून तर ते आले होते." सुलू म्हणाली.

हा प्रश्न आतांच काढूं नको म्हणून सुलूला डोळ्यांनीं सारखा खुणविण्याचा मी प्रयत्न करीत होतों. पण ती कसची ऐकते !

"काय काम होतं माझ्याकडे ?" रावबहाद्दुर म्हणाले.

"कांहीं कामाकरितां माझ्याकडे येण्याइतके तुम्ही धीट असाल असं वाटलं नव्हतं मला."

"मींच सांगितलं यायला त्यांना." सुलू म्हणाली.

"निदान कांहीं लाज तरी वाटायला हवी होती !" रावबहाद्दुर गुरगुरले.

"लाज तर वाटतेच आहे त्यांना." सुलू थट्टेच्या स्वरांत म्हणाली, "चांगले पुरुषासारखे पुरुष; पण एखाद्या सोळा वर्षांच्या मुलीसारखे लाजतात! नाहींतर त्यांनीं आतांपर्यंत तुम्हांला आपलं काम सांगि-तलं असतं !"

"लाज वाटावी अशा बऱ्याच गोष्टी करून त्यांची लाज मेली

असावी, असं वाटत होतं मला!" रावबहाद्दुरांचे हे शब्द त्यांच्या मिशांइतकेच भयंकर होते.

"सांगा ना तुमचं काम!" सुलू मला म्हणाली. मग आपल्या प्रेमळ बाबांकडे वळून ती म्हणाली, "बाबा, हे आले होते–सांगा ना."

"हं सांगा." रावबहाद्दुरांनीं मान खालीं केली.

"नाहीं, तसं कांहीं महत्त्वाचं नाहीं काम– मी आलों होतों आपली परवानगी घ्यायला–"

माझे हे शब्द ऐकून रावबहाद्दुर जरा दचकल्याचा मला भास झाला. मग त्यांनीं विचारलें, "परवानगी! आणखीं कसली परवानगी? काय आणखी नवीन कादंबरी वगैरे लिहिताय् कीं काय?"

"लिहीत नाहीं, पण लिहायला घेणार आहे लवकरच." त्यांनीं हा प्रश्न मधेंच कां विचारावा ह्याविषयीं आश्चर्य करीत मी म्हणालों.

"मग आतांच काय परवानगीची जरूर वाटली?" रावबहाद्दुरांनीं विचारलं.

"वा! आपली परवानगी तर अवश्य हवी." मी धीर करून म्हणालों. "मला–मी– सुलूशीं –आपलं सुलोचनाबाईंशीं लग्न करूं इच्छितों."

"सुलीशीं लग्न! हात्तिच्या! येवढंच! मला वाटलं तुम्हांला दुसरी कसली परवानगी पाहिजे आहे!" माझं बोलणं ऐकून रावबहाद्दुर जरा शांत झालेले मला स्पष्ट दिसून आलं. पण मग त्यांचं एंजिन पुन्हां धुसफुसूं लागलं. आणि संतापून ओरडले, "काय म्हणालां? सुलूशीं तुम्हांला लग्न करायचं आहे? आणि त्याकरितां माझी परवानगी हवी! अशक्य! निर्लज्ज माणसा, हें विचारायला तुला लाज कशी नाहीं वाटत?"

मला विचारावंसं वाटलं. जो माणूस निर्लज्ज आहे त्याला लाज कशी

वाटणार ? पण माझ्या तोंडांतून शब्द फुटला नाहीं. रावबहाद्दुरांनीं मला बोलायला फुरसतहि दिली नाहीं. ते सारखे गडगडत होते, बड-बडत होते, गरजत होते. "एवढं सारं करून, माझी येवढी नाचक्की करून वर माझ्या मुलीशीं लग्न करण्याची परवानगी मागतोस ? हं! ..."

ते बराच वेळ बोलत होते. त्यांत 'गाडलेलीं भुतं' आणि! 'हूं:! हूं:!' बऱ्याच वेळां डोकावत होतें. मला तर त्यांचं तें भाषण म्हणजे असंबद्ध भाषणाचा उत्कृष्ट नमुनाच वाटला. दुसऱ्या एखादे वेळीं तें भाषण ऐकून माझी भरपूर करमणूक झाली असती. पण आतांचा प्रसंग तसा नव्हता. तें भाषण असंबद्ध असलं, निरर्थक असलं, तरी त्यांतून एक अर्थ मात्र स्पष्ट दिसून येत होता कीं सुलूशीं लग्न कर-ण्याला ते मला कधींहि परवानगी देणं शक्य नाहीं.

मी रावबहाद्दुरांकडे गेलों होतों, तें केवढ्या आशेनं. पण राव-बहाद्दुरांच्या बंगल्याबाहेर मीं पाऊल टाकलं तेव्हां मी निराशेच्या सागरांत जवळजवळ गळ्यापर्यंत बुडालों होतों. जाण्यापूर्वीं मला वाटलं होतं, रावबहाद्दुरांकडून सुलूशीं लग्न करण्याची परवानगी मागणं, हें पोस्टांतून तिकिट खरेदी करण्याइतकंच सोपं काम होतं. रावबहाद्दुरांकडे मीं जातांच ते माझं मोठ्या अगत्यानं स्वागत करतील नि म्हणतील, "या या— कोण बळवंतराव देशपांडे का ? वा—मोठा आनंद झाला आपल्या भेटीनं !—वा ! 'गाडलेलीं भुतं' ना ? फार आवडली आपली कादंबरी—काय म्हणतां? सुलूशीं लग्न करायचंय तुम्हांला ? त्या गाढव पोरीशीं ? अन् माझी परवानगी पाहिजे ?—अवश्य ! केव्हां जुळलं तुमचं ?—लबाड आहे पोरगी !" असं रावबहाद्दुरांच्या भेटीचं चित्र मी मनाशीं रंगवलं होतं. पण प्रकार मात्र अगदीं उलटा झाला होता. मला पाहतांक्षणींच कुत्र्यानं

मांजरावर गुरगुरावं, तसं कांहीं कारण नसतां ते माझ्यावर तुटून पडले होते. साऱ्या प्रकाराचा नीट विचार केल्यावर ह्यांतून एकच अर्थ निघूं शकत होता. रावबहाद्दुर ही एक विक्षिप्त वल्ली असली पाहिजे! चक्रम्, चक्कर!

दिवसामागून दिवस जात होते. ह्या प्रकारानंतर रावबहाद्दुरांच्या बंगल्याचा उंबरठा ओलांडण्याचं धाडस माझ्याच्यानं होणं शक्यच नव्हतं. तरीपण सुलूच्या नि माझ्या मधूनमधून गाठीभेटी होतच होत्या. पण आमच्या आयुष्यांतली पौर्णिमा संपून आतां निराशेची दाट अमावास्या चालू झाली होती. नंदनवनांतून अॅडम आणि ईव्हप्रमाणं आमची ह्या दुःखानं भरलेल्या पृथ्वीवर—अन् त्यांतहि सहारा वाळवटांत हकालपट्टी झाली होती. रावबहाद्दुरांचा माझ्यावरचा रोष कधीतरी नाहींसा होईल, ह्या आशेवर, एकमेकांच्या बाहुपाशांत विसावून अश्रू ढाळण्याखेरीज आमच्या हातांत तरी कांहीं नव्हतं.

रावबहाद्दुरांचा माझ्यावर येवढा घुस्सा कां हेहि कळत नव्हतं. सुलूनं त्यांच्यासमोर माझं नांव काढलं की, ते आषाढी ढगाप्रमाणं गडगडूं लागत. गंगूनानांकडेहि दोनचारदां चकरा मारल्या. पण ते मुख्य विषयाला बगल मारून भलत्याच विषयावर बोलत. मी लिहीत असलेल्या नव्या कादंबरीच्या लेखनाविषयीं दोन उत्तेजनपर शब्द बोलत आणि मला कोरडा धीर देऊन माझी बोळवण करीत.

पण हें असंच तरी किती दिवस चालणार? ते विक्षिप्तराव एखादे दिवशीं सुलूला एखाद्या आय्. सी. एस्. च्या गळ्यांत देखील बांधून टाकायचे. मला माझ्या पुढील आयुष्याचं चित्र स्पष्ट दिसूं लागलं होतं. तें चित्र रंगविण्याकरितां फक्त एकच रंग वापरलेला होता—काळा!

आणि अशा रीतीनं मी निराशेच्या काळ्या समुद्रांत गटांगळ्या खात असतांना एक दिवस रावबहाद्दुरांच्या नोकरानं मला एक चिठ्ठी आणून दिली. ती चिठ्ठी अशी—

"आपण जी नवी कादंबरी लिहावयास घेतली आहे, ती घेऊन आज सायंकाळीं सहा वाजतां माझ्या भेटीस येणें. काम महत्त्वाचें आहे."

रावबहाद्दुरांच्या ह्या चिठ्ठीचा मला कांहींच अर्थबोध होईना. मी लिहीत असलेल्या नवीन कादंबरीशीं रावबहाद्दुरांना काय करायचं होतं? नि लिहितात, काम महत्त्वाचं आहे! बंदुक घेऊन मला मारायचा तर विचार नाहीं ना? कांहींच कळेना. रावबहाद्दुरांच्या विक्षिप्तपणाची कमाल झाली !

संध्याकाळीं सहाच्या सुमारास मृत्युपत्र तयार करून आणि जीव मुठींत धरून मी रावबहाद्दुरांच्या बंगल्यावर गेलों. समोरच सुलूला पाहून जरा धीर आला.

"हें काय ? कुठं आलांत ?" तिनं विचारलं.

"रावबहाद्दुरांकडे !" मी सुकलेल्या आवाजांत म्हणालों.

तिनं माझ्याकडे एकदां आश्चर्यानं पाहिलं. मग लढाईवर जाणाऱ्या आपल्या माणसाकडे पाहावं, तसं तिनं माझ्याकडे डोळे भरून पाहून घेतलं. मला एकदम रडूं येऊं लागलं.

"सुलू !" मी दाटलेल्या कंठानं म्हणालों.

"काय ?" तिनं विचारलं.

"कांहीं नाहीं !" असं म्हणून मीं तोंड बाजूला फिरवलं आणि डोळ्यांतले अश्रु तिच्या लक्षांत येणार नाहीं, अशा बेतानं पुसून काढले.

"हा काय वेडेपणा ?" सुलूनं विचारलं.

"कुठला ?" मी.

"बाबांना भेटायला यायची दुर्बुद्धि कां झाली तुम्हांला ?"

"त्यांनींच बोलावलं आहे मला."

"गेल्या दोनतीन दिवसांपासून तर ते अगदींच पिसाळले आहेत !"

"त्यांच्याजवळ बंदूक आहे का ?"

"नाहीं."

"नाहीं ? मग ठीक आहे !"

"पण सातबारी पिस्तुल आहे !"

"सुलू !"

"काय ?"

"तूं मला विसरून जा."

"विसरून जाऊं ?"

"होय. आणि कुणाशीं तरी लग्न करून सुखांत रहा."

"हें काय भलतंच बोलतां ?"

"खरं सांगतों. उगाच माझी आठवण काढून दुःखांत राहूं नकोस. तूं दुःखांत असलेली पाहून माझ्या आत्म्याला शांति मिळणार नाहीं!"

सुलूकडे एकदां डोळे भरून पाहून घेऊन भुकेलेल्या वाघाच्या पिंजऱ्यांत शिरावं त्याप्रमाणं मीं रावबहाद्दुरांच्या दिवाणखान्यांत प्रवेश केला. संतापलेल्या पण पिंजऱ्यांत कोंडलेल्या असहाय वाघाप्रमाणें रावबहाद्दुर दिवाणखान्यांत येरझाऱ्या घालीत होते. मी आलों आहें असं कळतांच, ते थबकून उभे राहिले. मग त्यांनीं डोळ्यांनींच माझा चट्टा-मट्टा केला. त्यांच्या मिशा पिंजारलेल्या होत्या. त्यांतले सारे केस माझ्यावर रोखलेल्या बाणाप्रमाणं ताठ उभे होते. थोडया वेळानं त्यांच्या कंठांत बसलेला राक्षस गडगडला,

"बसा !"

खालीं मान घालून मी एका खुर्चीवर बसलों.

"कादंबरी आणली आहे ?" त्यांनीं चिंतायुक्त स्वरांत विचारलं.

मी मानेनंच होकार दिला.

" ह्या कादंबरीबद्दल तुम्हांला काय मोबदला मिळेल ? " राव-बहाद्दुरांनीं विचारलं.

" मिळतील पांचसहाशें रुपये ! "

" मग मीं ती विकत घेऊं इच्छितों ! "

मी रावबहाद्दुरांकडे आश्चर्यानं पाहूं लागलों. " असं पाहतां काय?—मी तुम्हांला पांचशें रुपये देतों." टेबलावरचं चेकबुक आणत रावबहाद्दुर म्हणाले.

माझ्या मनाला विचार चाटून गेला, सुलूशीं आपलं लग्न होऊं शकत नाहीं, हें केवढं दुर्दैव. मला सासराहि मिळाला असता नि प्रकाशकहि.

" आपण ती प्रसिद्ध करूं इच्छितां का ? " मीं आनंदून विचारलं.

" मुळींच नाहीं ! " रावबहाद्दुर गुरगुरले.

" मग काय करणार आहांत आपण ही कादंबरी विकत घेऊन ? " मीं विचारलं.

" काय करणार आहे ? "

" होय, काय करणार आहांत ? "

" मी तिचे राईराईएवढे तुकडे करणार आहें. " एखाद्या राक्षस-पाटर्याप्रमाणं ओरडून रावबहाद्दुर म्हणाले, " आणि मग ते सारे तुकडे चुलींत घालणार आहें ! "

मी 'आ' वासून त्या विक्षिप्तरावांकडे पाहत राहिलों.

" असं वेडपटासारखं पाहतां काय? हूं: ! गाडलेलीं भुतं !—मी काय सांगतों तें ऐकूं येतं ना ? " रावबहाद्दुर ओरडले.

ते काय सांगत होते तें मला तर ऐकूं येतच होतं, पण तें बंगल्यां-तहि साऱ्यांना ऐकूं जात होतं. त्यांचा तो गडगडाट ऐकून सुलू धांवतच दिवाणखान्यात आली. तिनं एकदां माझ्यावरून दृष्टि फिरवली. शारीरिक दृष्टया मी सुखरूप असलेला पाहून तिनं एक समाधानाचा निःश्वास टाकला.

"मग? काय?" रावबहाद्दुरांनीं विचारलं.

"आपली ही विचित्र मागणी मला मान्य करतां येत नाहीं, त्याची क्षमा असावी!" मी बोलण्याचा हिय्या केला.

"सहाशें घ्या–सातशें घ्या!" रावबहाद्दुर म्हणाले.

"उं हूं!" मी मान हालवून म्हणालों.

"हजार घ्या."

"छट्!"

"काय पाहिजे तें मागा, पण कादंबरी द्या." आतां रावबहाद्दुरांचा आवाज निश्चितपणानं केंविलवाणा झाला होता.

"हें शक्य नाहीं. आपली दुसरी कुठलीहि मागणी मी सुलूकडे पाहून मान्य केली असती." मला आतां जरा धीर येऊं लागला होता.

"कादंबरीचं हस्तलिखित माझ्या ताब्यांत दिल्याशिवाय मी तुम्हांला इथून जाऊं देणार नाहीं!" रावबहाद्दुर म्हणाले.

"हा गहजब झाला!" मी.

"अन्न–सत्याग्रह करीन! बैठा संप करीन!"

"पण हें कसं शक्य आहे!".

"पाहा, नीट विचार करा. मला एवढी भिक्षा घालाच. मी पदर पसरतों!" रावबहाद्दुर म्हणाले. आपल्या मिशांच्या झडपा त्यांनीं आतां खालीं ओढून घेतल्या होत्या. मोठं केंविलवाणं दृश्य होतं तें! रावबहाद्दुर पुढं कळवळून म्हणाले, "सुले, तूं तरी सांग ग त्यांना."

"येवढं सांगतात बाबा, तर देऊन टाका ना." सुलू म्हणाली.

"आतां तूं सांगतेस तर जरा–" मी.

"तुम्हांला काय वाटेल तें देईन." रावबहाद्दुर.

"छे छे! तसं कांहीं नको! तुमच्याजवळून तसं काय घ्यायचं!" मी.

" क्याई नको ! क्याय घ्यायचं " सुलू मला वेडावून म्हणाली.

" आं ? " मी विचारलं.

" काय पाहिजे तें मागा मला सांगताहेत बाबा. " सुलू ' काय ' वर जोर देऊन म्हणाली. आणि माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला.

" मी मागेन तें द्याल ? " —मी रावबहाद्दुरांना विचारलं.

" देईन—एकदां शब्द गेला. " रावबहाद्दुर जरा आनंदून म्हणाले.

" मग मला सुलू हवी ! " मी.

सुलूनं हंसून मानेनं होकार दिला.

" काय ? सुलू ! " रावबहाद्दुर दचकून म्हणाले, " अशक्य ! तें पूर्वींच सांगितलंय् मीं."

" मग मी जातों तर. मला एके ठिकाणी जायचं आहे." घड्याळा-कडे पाहत मी म्हणालों.

" दुसरं कांहींहि मागा—" रावबहाद्दुर काकुळतीनं म्हणाले.

" उं हूं !"—मी उठल्यासारखं करून म्हणालों.

" थांबा—जाऊं नका. मला जरा विचार करूं द्या." रावबहाद्दुर मला खुर्चीवर बसवत म्हणाले. मग त्यांनीं दोनचार येरझाऱ्या मारल्या. त्यांच्या डोक्यांत चाललेल्या वैचारिक द्वंद्वाचं प्रतिबिंब, त्यांच्या चेहऱ्या-चा जेवढा भाग मिशाच्या आड लपलेला नव्हता, त्या भागावर स्पष्ट दिसत होतं. अखेरीस ते थांबले आणि हृदय पिळवटून टाकणाऱ्या स्वरांत म्हणाले, " नोचा, तूं मला चांगलंच कोंडींत पकडलं आहेस. पण आतां इलाज नाहीं. सुलूशीं लग्न करण्याला मी तुला परवानगी देतों." मग ते घाईघाईनं म्हणाले, " पण तें हस्तलिखित कुठं आहे; तें द्या."

मीं हस्तलिखिताचं पुडकं खिशांतून बाहेर काढतांच त्यांनीं त्याच्या-वर झडप घातली. मीं त्यांना विचारलं, " मग मी आतां सुलूला फिरायला घेऊन जातों, तुमची हरकत नसेलच ! "

पण माझ्या बोलण्याकडे रावबहाद्दुरांचं लक्ष होतं कुठं ? हस्त-लिखिताचा एकएक कागद घेऊन त्याचे राईराईएवढे पद्धतशीरपणानं तुकडे करण्यांत ते गर्क झाले होते. आपल्या पंचेंद्रियांचे बाकीचे सारे व्यवहार त्यांनीं स्थगित केले होते.

थोड्याच वेळांत मी नि सुलू फिरण्याकरतां बाहेर पडलों. आम्हीं दरवाज्यांतून मागं वळून पाहिलं. एखाद्या लहान मुलानं आपल्या आवडी-च्या नव्या खेळण्यांत गर्क व्हावं, तसे रावबहाद्दुर माझ्या हस्तलिखिता-चा नाश करण्यांत रमून गेले होते. त्यांच्या डोळ्यांत समाधान आणि शांति खेळत होतीं.

ही आनंदाची बातमी गंगूनानांना कधीं सांगेन असं मला झालं होतं. रात्रीं जेवून मी गंगूनानांकडे गेलों.

" गंगूनाना, काम फत्ते ! " मी म्हणालों.

" म्हणजे ? " मुळींच आश्चर्य न दाखवतां गंगूनानांनीं विचारलं.

" आमच्या लग्नाला रावबहाद्दुरांनीं संमति दिली ! " मी म्हणालों.

" ठीक झालं ! " गंगूनाना अशा स्वरांत म्हणाले कीं जणूं काय राव-बहाद्दुरांची परवानगी मिळणं ही गोष्ट सृष्टिक्रमाला धरूनच होती.

मग मीं त्यांना सारा प्रकार कथन केला आणि शेवटीं म्हणालों, " विक्षिप्तच आहेत रावबहाद्दुर आणि त्यांच्या विक्षिप्तपणामुळंच मला लग्नाची परवानगी मिळाली. " नंतर त्यांना खिजवण्याच्या उद्देशानं मी म्हणालों, " तुमच्यानं हा प्रश्न कांहीं सुटला नाहीं ! "

गंगूनाना कांहीं बोललेहि नाहींत कीं चिडलेलेहि दिसले नाहींत. त्यांनीं एक पिवळा हत्ती काढला आणि त्याला काडी लावली.

" पण रावबहाद्दुर माझ्यावर येवढे रागवावेत कां, हेंच कळत नाहीं ! " थोड्या वेळानं मी म्हणालों.

" तुम्हीं त्यांचं स्वभावचित्र रंगवलं म्हणून ! " गंगूनाना म्हणाले.

"तुमच्या 'गाडलेलीं भुतं' ह्या कादंबरींत एक रावबहाद्दुर आहेत ना? तें त्यांचंच स्वभावचित्र."

"छे, तें कसं शक्य आहे! कादंबरींतले रावबहाद्दुर पूर्णपणें काल्पनिक आहेत. ह्या रावबहाद्दुरांची तर मला कादंबरी लिहितांना माहितीहि नव्हती!" मी म्हणालों.

"पण कादंबरींतले रावबहाद्दुर आणि रावबहाद्दुर ढेकणे हे एकच आहेत, असा इथल्या लोकांचा समज झालेला आहे. ढेकण्यांची मित्रमंडळी तर त्यांना ह्यावरून पुष्कळच चिडवतात." गंगूनाना म्हणाले. "आणि गंमत अशी कीं ढेकण्यांच्या आयुष्यांतले कांहीं ठळक प्रसंगहि कादंबरींतल्या रावबहाद्दुरांच्या आयुष्यांत आलेले आहेत!"

"हा एक विलक्षण योगायोग दिसतोय्!" मी आश्चर्यानं म्हणालों. "बरं, पण मी लिहीत असलेली नवी कादंबरी रावबहाद्दुरांनीं कां फाडावी?"

"ह्या नव्या कादंबरींत रावबहाद्दुरांनीं पैसा कसा केला, हें तुम्ही सांगणार होतां!"

"म्हणजे!"

"रावबहाद्दुरांनीं आपल्या तरुणपणीं एका विधवेची इस्टेट गडप केली होती आणि ह्या घटनेचा तुम्ही नव्या कादंबरींत उपयोग करणार होतां!"

"काय सांगताय् गंगूनाना! ही भानगड तर मला कांहींच ठाऊक नाहीं; मग मी तिचा कादंबरींत उपयोग तरी कसा करणार?" मी गोंधळून म्हणालों.

"पण तुम्ही रावबहाद्दुरांना पत्र लिहून तसं कळवलं होतं!" येवढें बोलून ते टेबलापाशीं गेले आणि त्यांनीं त्यावरचं एक पत्र लिहिण्याचं पॅड उचललं. तें पॅड मला देत गंगूनाना म्हणाले, "हो, बरी आठवण

झाली. हें तुमचं पत्रं लिहिण्याचं पॅड. त्यांत तुमचं नांव नि पत्ता मोठा झकास छापलेला आहे हं. पांचसहा दिवसांपूर्वी हें मागण्याकरितां मी तुमच्याकडे आलों होतों. पण तुम्हीं घरीं नव्हतां. तुमच्या परवानगी-वांचून मी हें घेऊन आलों ह्याची क्षमा असावी."

येवढं बोलून गंगूनानांनीं एक फर्मास झुरका मारला.

---

# ७. उलटीचें औषध

असा कांहीं प्रसंग माझ्यावर येऊन गुदरला कीं मग ‘ शाधि मां त्वां प्रपन्नम् ’ असं म्हणत गंगूनानांच्या पायांवर डोई ठेवण्याखेरीज मला गत्यंतर नसतं. माझे गुरु, मार्गदर्शक आणि मित्र अशा त्रिविध भूमिका गंगूनानांनीं आतांपर्यंत मोठ्या कार्यकुशलतेनें पार पाडलेल्या आहेत. आमच्या ससारसागरावर वेळोवेळीं जेव्हां लहानमोठी वादळं उठतात, तेव्हां गंगूनाना मला ध्रुवताऱ्याप्रमाणं मार्गदर्शन करीत आले आहेत, नि माझी जीवननौका त्यांनीं ‘ आलबेल ’च्या किनाऱ्याला सुरक्षितपणानं आणून सोडलेली आहे. अर्थातच काळ्या बाजारांत मी गिऱ्हाइकी केल्यावर आणि सुलूनं माझ्या मूर्खपणाचं माप माझ्या खिशांत पुरेपूर टाकल्यावर त्यांतून मार्ग काढण्याकरितां मला गंगूनानांना शरण जाणं भागच होतं.

कुठल्याहि सत्प्रवृत्त नागरिकानं काळ्या बाजारांत कधी व्यवहार करूं नये असं माझं मत पूर्वींहि होतं—आणि आतां तर त्याबद्दल माझी खात्रीच पटली आहे. पण केव्हां केव्हां परिस्थितीच अशी विचित्र येते, कीं करूं नयेत त्या गोष्टीहि माणसाला कराव्या लागतात.

त्या दिवशीं मी माझे मित्र श्री. कोरेडी ह्यांच्याकडे जेवावयास गेलों होतों. जेवण चांगलं पोटभर झालं होतं व मी सुखसागराच्या अगदीं सखोल भागावर तरंगत होतों. ह्या जगांत युद्धं, दंगेधोपे, अन्नवांटपपद्धति वगैरे भयंकर गोष्टी आहेत ह्याचा मला अगदीं विसर पडला होता आणि त्याच सुखाच्या तंद्रींत मीं घरीं येऊन पोंचलों.

माझा अनुभव असा आहे, कीं नवरा सुखी दिसला कीं बायकोला मत्सर वाटतो; त्याचं सुख तिला पाहवत नाहीं. त्याच्या सुखस्वप्नांतून ती त्याला जागं करते आणि निष्ठुरपणानं वस्तुस्थितीची भेसूर जाणीव त्याला करून देते.

कपडे काढून झाल्यावर आरामखुर्चीत पहुडून मी आतां एक सिगरेट शिलगावणार इतक्यांत सुलू म्हणाली, " म्हटलं, आतां एक सैपाकीण ठेवा!"

" कां ? हें काय आणखी नवीनच ?"

" नवीन नाहीं अन् जुनं नाही! मला स्वयंपाक झेपत नाहीं!" सुलू फणकाऱ्यानं म्हणाली.

" वा!" कोरेडीच्या मेजवानीनं माझ्या पोटांत गुदगुल्या केल्या अन् मी विनोद करण्यास प्रवृत्त झालों, "स्वयंपाक झेपत नाहीं! अग, पण न झपण्याइतका स्वयंपाक करायला सरकार मुळी जास्त धान्य देतंच कुठं?"

" पण तेवढं दिखील माझ्याच्यानं व्हायचं नाहीं! " माझ्या विनोदाकडे दुर्लक्ष करून सुलू निक्षून म्हणाली, " तुम्हांला माझी काळजीच नाहीं! "

" कांहीतरी काय बोलतेस ? " सात्त्विक संतापाचा आव आणून मी प्रश्न केला आणि पोटावरून हात फिरवीत एक ढेकर दिला.

साधे चारच शब्द, पण सुलूची कळी खुलवण्याचं सामर्थ्य त्यांच्यांत होतं. तशी तिची कळी थोडीशी खुलूंहि लागली होती. पण तेवढ्यांत तिनं माझा एक ढेकर ऐकला आणि मग ती एकदम संतापानं बोलूं लागली, " हें रेशनचं धान्य खाऊन मी मेलें तरी तुम्हांला कांहीं वाटायचं नाहीं! उलट तुम्हांला बरंच वाटेल! तुम्हांला काय, तुम्ही

आपले मित्रांकडे जाऊन काळ्या बाजारांतल्या धान्याच्या मेजवान्या झोडा; इकडे घरांत बायको अपचनानं मेली आणि मुलं खरजेनं सडलीं तरी तुम्हांला त्याची पर्वा नाहीं ! ”

तिनं आपल्या जिभेचा पट्टा असा आणखी कितीतरी वेळ चालू ठेवला ! तिच्या बोलण्यानं माझ्या पोटांतील कोरेडींची मेजवानी साफ जिरून गेली होती आणि मी गंभीरपणानं विचार करूं लागलों होतों.

सुलू जरी अतिशयोक्तिपूर्ण बोलत असली तरी तिच्या बोलण्यांत तथ्यांश होता खरा. सध्यां मिळत असलेले रेशनचे तांदूळ अपुरे तर होतेच पण ते पचायलाहि जड होते. त्यांना पचनीं पाडणं हें साध्यासुध्या माणसाचं काम नव्हतं. लोखंडाचे चणे पचविण्याची ज्यांची कुवत होती, अशीं माणसंच ह्या तांदळाचा भात पचवूं शकत. त्या तांदळांच्या अंगचा हा गुण लक्षांत घेऊन स्वयंपाकघरांतल्यापेक्षां त्यांचा उपयोग मीं दवाखान्यांतच अधिक करीत असें. जो पेशंट एरंडेल घेण्याचा कंटाळा करी त्याला मी छटाक तांदळाचा भात करून खावयास सांगत असें आणि मग त्या पेशंटचा कोठा साफ होत असे ! सुलूला हे तांदूळ खाऊन अपचनाचा विकार जडला होता आणि मुलांना झालेली खरूज हाहि रेशनच्या धान्याचाच प्रभाव आहे अशी लोकवदंता रूढ होती. मी ह्यावर विचार करतों आहें, तों सुलूच्या भाषणाचा नेहमीचा उपसंहार माझ्या कानांवर येऊन पडला, “ तुम्ही निव्वळ शिराळशेठ आहांत. नुसते आरामखुर्चींत सिगरेट ओढीत स्वस्थ बसून राहा. मुळीसुद्धां हातपाय हालवूं नका; मग इकडं बायकोपोरांचं काही का होईना ! नाहींतर कोरेडो पाहा, तरटे डॉक्टर पाहा. रेशनिंग सुरू होणार म्हटल्याबरोबर त्यांनी काळ्या बाजारांतून गव्हाचीं अन् तांदळाचीं पोतीं आणून ठेवलीं ! मित्रांच्याकडे मेजवान्या झोडायला जातां तेव्हां त्यांच्याकडून एवढी अक्कल तरी शिकून या ! ”

आतां मात्र सुलूचा भडिमार मला असह्य झाला. आपल्या बायकोनं आपणाला मूर्ख ठरवून आपल्या मित्रांची स्तुति केलेली कुठल्या नवऱ्याला आवडेल?

माझी माझ्या मित्रांशीं तुलना करून सुलू मला व्यवहारज्ञानांत कमी लेखी. तिला मीं कितीदां तरी सांगितलं होतं, कीं अशा क्षुल्लक सांसारिक गोष्टींत लक्ष घालीत बसायला माझा जन्म नाहीं. साहित्य, राजकारण, मानवता वगैरेंच्या बौद्धिक, उच्च, उदात्त वातावरणांत मी नेहमीं वावरत असतों. नीटनेटका संसार करणाऱ्या कोरेडी-तरटयांपेक्षां माझी योग्यता फार मोठी आहे. त्यांच्या मृत्यूनंतर लव-करच लोक त्यांची आठवण विसरून जातील; पण माझं नांव मात्र पिढयान् पिढया राहील. पण तिच्या डोक्यांत कधीं हें शिरेल तर शपथ! बायकांची बुद्धीच तेवढी! उगाच नाहीं तुकोबांचा जिजाईनं येवढा छळ केला!

"मग, तुझं म्हणणं काय? काळया बाजारांतून तांदूळ आणूं?" मी जरा चिडूनच विचारलं.

"काळया बाजारांतून आणा नाहीं तर गोऱ्या बाजारांतून आणा. पण कुठून तरी आणा म्हणजे झालं!"—सुलू.

"अग, पण काळया बाजाराला उत्तेजन देणं चांगलं नाही. राष्ट्राचा हा मोठा गुन्हा आहे!"

"चुलींत गेलं तें तुमचं राष्ट्र! आपण जिवंत राहिलों तर मग राष्ट्र न् बिष्ट्र!"

माझ्या धर्मपत्नीच्या ह्या संकुचित दृष्टिकोनाकडे पाहून मला वाईट वाटलं. राष्ट्राविषयीं आणखी कांहीं अपमानकारक उद्गार काढण्याचं पाप तिच्याकडून होऊं नये म्हणून मग काळया बाजारां-तून तांदूळ खरेदी करण्याचं मी तिला वचन दिलं.

कोरेडीकडे जेवतांजेवतांच मला पत्ता लागला होता, कीं त्यांनीं भालेरावांकडून तांदुळाचं पोतं आणलेलं होतं. तांदूळ 'एकदम फर्स्ट क्लास' होता आणि त्याचा भावहि तीन रुपये पायली म्हणजे ह्या दिवसांत काळचा बाजाराच्या मानानं जरा स्वस्तच होता!

भालेरावांची आणि माझी बऱ्यापैकीं ओळख होती. आमच्या गांवच्या प्रत्येक रहिवाशाची त्यांच्याशीं बहुधा बऱ्यापैकीं ओळख होती. गांवांत कुठलाहि समारंभ असो, तिथं व्यासपीठावर लुडबुड करतांना भालेराव दिसले नाहींत असं सहसा कधीं होत नसे. भालेराव अंगकाठीनं किरकोळ आणि किंचित् काळसर गृहस्थ होते. त्यांच्या जिभेवर साखर तर इतकी पेरली होती, कीं निव्वळ त्या साखरेवरच ते काळाबाजार थाटूं शकले असते. एखाद्या थर्ड क्लासच्या डब्यांत उतारू खच्चून भरलेले असावेत, तसा त्यांच्या प्रत्येक शब्दांत नि पावलांत आत्मविश्वास भरून राहिलेला होता. काळाबाजारच काय, पण कुठलंहि काळं कृत्य हा गृहस्थ मोठ्या शिताफीन करूं शकेल, असा त्याच्याकडे पाहणाऱ्याला विश्वास वाटत असे. म्हणून मी तांदुळाकरिता भालेरावांची गांठ घेतली.

थोड्या इकडच्यातिकडच्या गप्पा झाल्यावर मी भालेरावाना म्हणालों, "तुमच्याकडे एक काम आहे बुवा!"

"काय? सांगा ना. तुमच्या कामाला कधीं कुणीं नाहीं म्हटलं आहे?"

"नाहीं...काम म्हणजे तसं जरा नाजुक आहे. आम्हांला एक पोतंभर तांदूळ पाहिजेत."

"तुम्हांला एकच दिवस उशीर झाला!" खेदाच्या स्वरांत भालेराव म्हणाले, "एकच पोतं राहिलं होतं आणि तें कालच खपलं. असा तांदूळ होता एकदम फर्स्ट क्लास जिरेसाळ! आणि भावहि काहीं विशेष नव्हता. पण आतां व्हेरी सॉरी!"

आतां रिकाम्या हातांनीं घरीं परत जाऊन सुळूला तोंड तरी कसं दाखवूं ह्या काळजींत मी चूर झालों. त्या काळजीची सांवली माझ्या तोंडावर पडलेली भालेरावांना दिसली असावी आणि त्यांना माझी कींव आली असावी. थोडा वेळ विचार करून ते म्हणाले, " हें पाहा डॉक्टर, तुमच्याकरितां म्हणून एक मार्ग तुम्हांला सुचवतों. असं करतां येईल. हो, फरेंडकरतां एवढं नाहीं करायचं तर कुणाकरतां करायचं? माझा एक फरेंड आहे व्यापारी; त्याच्याकडून मिळण्यासारखं असलं तर पाहातों एखादं पोतं. "

" पाहा, पाहा, जरूर पाहा. " त्यांच्या ह्या बातमीनं उल्हसित होऊन मी म्हणालों, " कसंहि करून एक पोतं मिळवाच. "

ठरल्याप्रमाणं संध्याकाळीं भालेराव मला येऊन भेटले.

" आहे त्याच्याकडे एक पोतं. नशीब तुमचं ! त्याच्याकडेहि अगदीं एकच राहिलं होतं. द्यायला तयार नव्हता तो; पण केला त्याला तयार. एकदम फर्स्ट क्लास आहे तांदूळ ! .."

" मग आणा ना ! " मी आनंदून म्हणालों.

" आणतों. पण त्याला पैसे आधीं पाहिजेत. हो, हा गुपचुपीचा व्यवहार ! "

" अं अं ! ..." मी मोठ्या व्यवहारीपणानं म्हणालों, " पण त्याला माझं नांव सांगितलं असतंत तर त्यानं आधीं पैसे मागितले नसते. "

" वा वा ! " मोठमोठ्यानं हंसून भालेराव म्हणाले, " डॉक्टर, अगदीं भोळे आहांत तुम्ही. अहो, तुमच्यासारख्या सुशिक्षिताचं नांव सांगितलं तर तो पोतं मुळींच द्यायचा नाहीं. हे काळाबाजारवाले सुशिक्षितांना फार घाबरतात. हे सुशिक्षित केव्हां पोलिसाला कळवतील आणि घात करतील ह्याचा नेम नाहीं, असं वाटतं त्यांना ! शिवाय

घरांत पोतंभर तांदूळ ठेवायचे हाहि एक गुन्हा आहे, त्या दृष्टीनं तुमचं नांव गुप्त ठेवणंच चांगलं नाहीं का ? "

भालेरावांचा युक्तिवाद मला पटला. मीं मुकाट्यानं घरांतून नव्वद रुपये आणून भालेरावांच्या हातावर ठेवले !

" आज रात्रीं बारा वाजतां पोतं आणून टाकतों इथं. तुम्हीं अगदीं काळजी करूं नका ! " भालेरावांनीं आश्वासन दिलं आणि मग ते निघून गेले.

जसजशी रात्र पडूं लागली, तसतसं आम्हीं मोठ्या उत्सुकतेनं तांदळाच्या पोत्याच्या आगमनाची वाट पाहूं लागलों. रस्त्यानं टांग्याचा आवाज आला कीं वाटे, आले भालेराव पोतं घेऊन ! जरा कुठं खुट्ट वाजलं कीं वाटे, भालेरावच दार ठोठावताहेत ! व आम्हीं घाईघाईनं दार उघडायला जावं. त्या रात्रीं दाराशीं माझ्या शंभर तरी चकरा झाल्या असतील ! रात्रीं जवळजवळ दोन वाजेपर्यंत आम्हीं भालेरावांची वाट पाहत जागरण केलं व मग कंटाळून झोपीं गेलों.

माणसाचं मन काय विचित्र असतं पाहा ! कायकाय शंकाकुशंका मनांत येऊन धुमाकूळ घालतात ! सकाळीं उठल्यावर उगाचच आपलं राहूनराहून मनाला वाटायला लागलं, कीं भालेरावांना आपण आधीं पैसे देऊन बसलों, ही मोठी चूक केली! व्यवहाराच्या दृष्टीनं हें ठीक झालं नाहीं. हो, नव्वद रुपये म्हणजे माझ्या दृष्टीनं कांहीं लहानसहान रक्कम नव्हती ! निदान पांचसहा लघुकथांचा मोबदला होता तो ! आतां काय करावं ?

पण मीं कांहीं करण्याच्या आधीं स्वत: भालेरावच माझ्याकडे आले. रात्रीं एकाएकीं परगांवाहून एक पाहुणे त्यांच्याकडे आल्यामुळं त्यांना तांदूळ आणण्यास जमलं नव्हतं. " आज रात्रीं अगदीं नक्की! " असं आश्वासन देऊन ते निघून गेले.

आणि त्या रात्रीं खरोखरच ते दोन पायली तांदूळ स्वतःच्या पाठी-वर वाहून घेऊन आले !

"हें काय? दोनच पायली आणल्या !" जरासा विरस होऊनच मीं विचारलं.

"डॉक्टर..." धापा टाकीत भालेराव म्हणाले, "तुम्हांला कल्पना नाहीं ह्या व्यवहाराची. हा व्यवहार ह्या कानाचा त्या कानाला कळूं देतां उपयोगी नाहीं. मीच रोज दोनदोन पायली आणून टाकीन !"

दुसऱ्या दिवशीं त्या तांदळाचा भात आम्हीं पोटभर खाल्ला. आणि तेव्हां माझ्या मनांत विचार आला, काळ्या बाजारवाल्याचा कितीहि निषेध केला तरी एका अर्थी ते समाजाचे उपकारकर्ते आहेत ह्यांत कांहीच संशय नाहीं !

त्या दिवशीं रात्रीं आम्हीं भालेरावांची आणि त्यांच्या तांदळांची वाट पाहिली. नंतर आणखी कितीतरी रात्री गेल्या; पण भालेरावां-कडून तांदूळ आले नाहींत ! नंतर मग मी भालेरावांकडे चकरा मारा-यला सुरुवात केली.

"या डॉक्टर, तुम्हीं स्वतः येण्याची तसदी घेतलीत ?" माझ्या-करितां एक खुर्ची झटकतां झटकतां भालेरावांनीं प्रश्न केला.

"नाहीं, आपलं..." मी बोलूं लागलों.

"आधीं हें सांगा, चहा घेणार कीं कॉफी ?" भालेरावांनी प्रश्न केला.

"छे. कांहीं नको. मी आत्तांच घेऊन आलोंय्." मी म्हणालों.

नंतर मग त्यांनीं मला चहाचा आग्रह केला; सिगरेटची डबी माझ्यापुढं धरली आणि आंत ओरडून दोन चहाची ऑर्डर दिली. मी आधींच जरा भिडस्त, त्यांतून भालेरावांच्या ह्या पाहुणचारानं तर

मी गारीगार होऊन गेलों! त्यांच्याविषयीं माझ्या मनांत अविश्वास उत्पन्न झाला ह्याची, माझी मलाच लाज वाटली. राहिलेले तांदूळ त्यांनीं आणूं नयेत त्याला तसंच कांहीं अपरिहार्य कारण असलं पाहिजे असा मी तर्क केला.

उठण्यापूर्वीं अगदीं सहज म्हणून भालेरावांच्या भावना यत्किंचित्‌हि दुखवणार नाहींत ह्याची काळजी घेऊन मीं त्यांना प्रश्न केला, " मग तांदूळ कधीं पाठवतां ?"

" आज रात्रीं अगदीं नक्की. मधें जरा घोटाळा झाला हो. एका माणसाबरोबर मी चार पायल्या पाठवल्या होत्या, पण त्याला पोलिसनं मधेंच पकडलं. नंतर सोडवलं मग त्याला. पोलिसला दोन पायल्या दिल्या. आतां मीच आणून टाकीन थोडेथोडे. आज रात्रीं नऊ वाजतां अगदीं नक्की. फार जोखमीचं काम !"

त्या रात्रीं मी क्लबांत गेलों नाहीं. भालेरावांची वाट पाहत दरवाज्याशीं येरझाऱ्या घालीत राहिलों.

पण भालेराव कांहीं आले नाहींत! आणि नंतरहि ते कधीं आले नाहींत.

सुलूचा अपचनाचा विकार पुन्हां बळावला आणि त्याबरोबर माझ्या व्यवहारज्ञानाच्या अभावावर तिनं कोरडे ओढावयास सुरुवात केली. कोरेडी, तरटे ह्यांच्याबरोबर माझी पुन्हां तुलना होऊं लागली आणि त्या तुलनेंत, शिशुसप्ताहांत पहिलं बक्षीस मिळवणाऱ्या शिशूपुढं एखादं मुडदुस झालेलं पोर फिक्कं पडावं, तसा मी फिक्का पडूं लागलों. माझ्या मूर्खपणाचं माप तिनं पुरेपूर माझ्या पदरांत टाकलं होतं आणि येतांजातां ती मला ह्यावरून टोंचून बोलूं लागली होती. तांदुळाकरितां नाहीं तरी सुलूचा हा भडिमार चुकवण्याकरितां म्हणून मग मी भालेरावांकडे रोज चकरा मारूं लागलों. परंतु भालेरावांनीं मला कांहीं

दाद दिली नाहीं. मी दिसतांच त्यांच्या तोंडावर एखादा अगदीं लंगोटी-यार फारा दिवसांनीं भेटावा तसा आनंद दिसूं लागे आणि त्याच प्रमाणांत ते माझा आदरसत्कार करीत; आणि मग मी त्यांना कशी-बशी तांदळाची आठवण करून देऊन आणि आज रात्रीं अगदीं नक्की तांदूळ मिळतील असं त्यांच्याकडून आश्वासन घेऊन घरीं परत येई. पण तांदूळ नाहीं तो नाहीच !

काय करावं हें मला सुचेना.

आतां गंगूनानाना शरण जाण्याखेरीज मला गत्यंतर नव्हतं.

जगज्जेत्या अलेक्झांडरचा गुरु अरिस्टॉटल हा अर्थशास्त्र, धर्मशास्त्र, आधिभौतिकशास्त्र, काव्यशास्त्र वगैरे अनेक शास्त्रांत पारंगत होता. शिवाय सत्याचा तत्त्वज्ञानी, महान् वक्ता आणि सर्वज्ञ अशी त्याची ख्याति होती. नवशोधांविषयीं जिज्ञासा आणि बुद्धीची तत्परता, सखोल विवेचक विचारशक्ति वगैरेंबद्दलहि तो नामांकित होता. एका दृष्टीनं मी अलेक्झांडरपेक्षां स्वतःला अधिक भाग्यवान् समजतों. कारण माझे गुरु जे गंगूनाना ते ह्या साऱ्या विषयांत तर पारंगत आहेतच; पण अरिस्टॉटलच्या स्वप्नांतहि कधीं आले नसतील अशा होमिओपाथी, विमाशास्त्र, युद्धशास्त्र, व्यवहारशास्त्र, कायदेशास्त्र वगैरे कितीतरी नवीन शास्त्रांत देखील त्यांनीं तज्ञता संपादन केलेली आहे. शिवाय अरिस्टॉटल कधीहि नव्हता असे ते मधूनमधून विमा एजंट, वैद्य, खाजगी हेर, मुखत्यार वकील इ. इ. कितीतरी होते. कुठलीहि अडचण आली कीं ती त्यांच्यासमोर मांडणं, हा ती अडचण दूर करण्याचा सर्वांत सोपा मार्ग होता.

सकाळींच मी गंगूनानांच्या घरीं गेलों. माझा चिंताग्रस्त चेहरा पाहून त्यांची कळी खुलली. त्यांनीं अगदीं आनंदाच्या स्वरांत विचारलं, "हं, आतां काय नवीन भानगड आणलीत ?"

"अं हं. भानगडबिनगड कांहीं नाहीं. आलों आपला सहज." मं उडवाउडवीच्या स्वरांत उत्तर दिलं. आणि मग सारा प्रकार हळूहळू निवेदन केला.

"थोडक्यांत म्हणजे तुम्हीं हा एक मूर्खपणाच केला!" सार इतिहास ऐकून झाल्यावर गंगूनानांनीं शेरा मारला.

"हें ऐकायला मी तुमच्याकडे आलों नाहीं." मी जरा रागानंच म्हणालों.

"रागावूं नका; केव्हांकेव्हां होतं असं." गंगूनाना म्हणाले. "चांगली शहाणीं माणसंदेखील असा मूर्खपणा करतात, मग तुमची काय कथा?"

"आतां ह्यांतून मार्ग काय?" मीं काकुळतीनं प्रश्न केला.

"ह्यांतून मार्ग!" गंगूनानांनीं एक लवंगी विडी काढून शिलगा वली आणि आपल्या तुंदिल बुटक्या तनूला घेऊन ते जोरजोरान आंखूड पावलं टाकीत, खोलींतल्या खोलींत येरझाऱ्या घालू लागले येरझाऱ्या घालतां घालतां ते जमिनीला उद्देशून बोलूं लागले, "प्रथम साऱ्या परिस्थितीचा आपण नीट विचार करूं. तुम्हीं भालेरावांना पैसे दिले ह्याची तुमच्याजवळ पावती नाहीं, किंवा तसं शाबीत करणारा दुसरा कांहीं पुरावाहि नाहीं. तसला कांहीं पुरावा असला तरी त्याचा उपयोग नाहीं. आणि कारण तुम्ही हे पैसे काळ्या बाजारांतून तांदूळ घेण्याकरितां भालेरावांना दिले आहेत. तेव्हां त्याची वाच्यता केली तर त्यापासून तुम्हांलाहि धोका आहे. तुम्हांला ह्या बाबतींत कोर्टांत जातां येत नाहीं किंवा पोलिसलाहि कळवतां येत नाहीं हें धूर्त भालेराव जाणून आहेत आणि त्याचाच फायदा ते घेत आहेत. तर आतां आपणहि त्यावर असाच इलाज केला पाहिजे, कीं ज्यामुळं भालेराव असेच पेंचांत सांपडतील आणि तुमचे पैसे परत करतील..."

"होय, पण काय पेंच टाकायचा?"

"त्यांनीं तुमचे हे पैसे गिळंकृत केले आहेत. होय ना?"

"निस्संशय!"

"मग ते त्यांना ओकायला लावण्याकरितां त्यांना उलटीचं औषध दिलं पाहिजे!"

"कबूल! पण तें औषध काय तें सांगा ना!"

गंगूनानांनीं पुन्हां एकदां येरझाऱ्या घालायला सुरुवात केली. टक्कल पडलेल्या त्यांच्या डोक्याच्या आंतून आतां कुठला संदेश बाहेर पडतो, हें ऐकण्याकरितां मी मोठ्या आशेनं कान टवकारून बसलों होतों.

"धटासी धट, आणि खटनटासी खटनट!" एक झुरका सोडून गंगूनाना म्हणाले.

त्यानंतर गंगूनानांच्या नेतृत्वाखालीं माझ्या हालचाली सुरू झाल्या. भालेरावांकडे चकरा टाकून त्यांच्याकडून काढतां येतील तेवढे तांदूळ काढावेत, असा त्यांनीं मला तात्पुरता सल्ला दिला होता. त्याप्रमाणें मी नियमितपणानं भालेरावांच्या घरीं चकरा मारूं लागलों. पहिल्या वेळीं भालेरावांनीं मी दिसतांच माझ्या गोष्टींची स्तुति सुरू केली. दुसऱ्या खेपेला त्यांना एकदां आगगाडींत सहज भेटलेल्या एका बड्या साहित्यिकाला माझ्या गोष्टींत कुठले गुण दिसून आले ह्याचा त्यांनीं पाढा वाचला. तिसऱ्या वेळीं त्यांनीं गांवांतील इतर डॉक्टर कसे बेपर्वा आहेत आणि त्यांचं ज्ञान साध्या मलेरियाच्या केसेसचं निदानहि करतां न येण्याइतकं कसं तुटपुंजं आहे, ह्यावर व्याख्यान दिलं. चौथ्या वेळीं मी तोंड उघडण्यापूर्वींच ते म्हणाले, "डॉक्टर, उद्यां तुमच्याकडे एक पेशंट येणार आहे बरं का! चांगला पैसेवाला आहे. मला कालच भेटला होता. म्हटलं, 'उगाच इकडेतिकडे कशाला फिरतोस आणि

पैसे पाण्यांत घालतोस ? आमच्या डॉक्टर देशपांड्यांकडे जा. फार हुषार डॉक्टर.' चांगली शंभर एक रुपयांची केस आहे."

भालेरावांकडे जायला निघतांना 'तांदूळ द्या नाहींतर पैसे तरी द्या' हें वाक्य मी मनांतल्या मनांत शंभरदां तरी घोकून जात असें. पण भालेरावांच्या समोर मी तें कधीच उच्चारलं नाहीं. त्यांच्याकडून परत निघायच्या वेळीं दिलगिरीपूर्वक मी एवढंच म्हणे, "आमचे तांदूळ—आहे ना आठवण ?"

आणि मग भालेराव मला "आज रात्रीं नक्की !" म्हणून वचन देत आणि मी निश्चित मनानं परत येई.

मी पुन्हां एकदां गंगूनानांची भेट घेतली आणि माझ्या प्रयत्नांची लज्जास्पद फलश्रुति त्यांना निवेदन केली. मी म्हणालों, "सध्यां भाले-रावांना आपण देत आहोंत तें औषध उलटीचं नसून पचनाचं असावं असं मला वाटतं. आतां त्यांनीं ते पैसे जवळजवळ जिरवलेलेच दिसतात !"

ह्यावर गंगूनानांनीं ओंवी म्हटली—

**"सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील तयाचें !"**

असेच वरेच दिवस गेले. शेवटीं मी गंगूनानांना भेटलों. भालेरावां-कडून पैसे काढण्याचा एखादा सोपा आणि खात्रीशीर मार्ग सांपडूं नये ह्याविषयीं मी त्यांची निर्भर्त्सना केली आणि भालेरावांसमोर त्यांचा जो पराभव झाला होता, त्यामुळं चिडून भालेरावांच्या तांदुळावर मी त्यांच्यादेखत उदक सोडलं !

ह्या गोष्टीला आठएक दिवसच झाले असतील. मला भीति वाटावी आणि आश्चर्याचा झटका बसावा असा प्रकार एका सकाळीं घडला. मी दवाखान्यांत बसलों असतां खुद्द भालेरावांची स्वारीच दवाखान्यांत येऊन हजर झाली.

त्यांनीं प्रथम नेहमींप्रमाणं इकडच्यातिकडच्या गोष्टी केल्या आणि जातांजातां माझ्या हातांत नोटांचं एक पुडकं ठेवीत ते म्हणाले, " हे घ्या तुमचे ब्यायशीं रुपये! काय डॉक्टर, किती चकरा मारल्या तुम्हीं ह्या एवढ्याशा रकमेकरितां! आणि किती त्रास दिला मला! मी काय खाऊन जाणार होतों तुमचे पैसे ? . . ."

ते पैसे माझ्या हातांत पाहून मला आनंदाश्चर्याचा एवढा मोठा धक्का बसला होता, कीं भालेरावांचे पुढचे शब्द मला मुळींच ऐकूं आले नाहींत! ते पैसे घेऊन मी घरांत सुलूकडे गेलों आणि ते पैसे तिच्या पुढ्यांत फेकून देऊन म्हणालों, " पाहा, दिले कीं नाहीं भालेरावांनीं पैसे परत आणून? मला वाटतच होतं, तो माणूस तसा लबाड नाहीं म्हणून. आणि म्हणून तर मी पैसे आधीं देऊन बसलों. माझी माणसाची पारख कधी चुकायची नाही. मला व्यवहारज्ञान नाही म्हणून तूं मला काय काय बोललीस! आणि ते शहाणे गंगूनाना! त्यांना वाटतं, शहाणपणाचा सारा गड्डा देवानं आपल्यालाच दिलाय्! —बिचारे भालेराव! मीं मात्र चकरा मारूनमारून त्यांना खूपच त्रास दिला! "

" मिळाले का पैसे? बरं झालं! " सुलू टेबलाकडे जात म्हणाली. " हो. मघा गंगूनाना येऊन गेले, तुम्हीं व्हिजिटला गेलां होतां तेव्हां. एक कागद ठेवून गेलेत ते. "

" कागद! कसला कागद? "

" उलटीच्या औषधाचं प्रिस्क्रिप्शन आहे असं कायसं म्हणाले! "

तिनं दिलेला कागद मी हातांत घेतला आणि मोठ्या कुतूहलानं त्याची घडी सोडवून मी वाचूं लागलों—

" गं. प. भालेराव यांस पाठविलेल्या नोटिशीची नक्कल—

## नोटीस

रा. रा. गं. प. भालेराव, राहणार पद्मपूर यांस, ह्या नोटिशी-अन्वयें कळविण्यांत येतें, कीं आमचे अशील डॉ. दा. गो. देशपांडे, एम्. बी. बी. एस्., राहणार पद्मपूर ह्यांचेकडून तुम्ही स्वतःला गुप्त रोग झाला असतां औषधोपचार करून घेतलेत. इन्जेक्शन्स व इतर उपचार मिळून आमचे अशिलाचे तुमचेकडे रु. ८२ (अक्षरीं रुपये ब्यायशी) बिल झाले आहे. त्यास पांच महिने होऊन गेले. ह्याबाबत आमच्या अशिलानें तुमचेकडे तगादाहि करून पाहिला. तरीपण तुम्ही त्यांतली अजून एक कपर्दिकहि दिली नाहीं. तरी ही नोटीस तुम्हांस मिळाल्या-पासून पंधरा दिवसांच्या आंत जर तुम्हीं आमच्या अशिलाचें सर्व बिल पैन् पै चुकतें केलें नाहीं, तर तुमच्यावर कोर्टांत कायदेशीर इलाज केला जाईल. मग आमच्या अशिलास, ज्या गोष्टी त्यानें गुप्त ठेवाव्यात त्या भरकोर्टांत सांगणें भाग पडल्यास त्याची सारी जबाबदारी तुमच्यावर राहील.

गंगूनाना कुलकर्णी
मुखत्यार वकील, पद्मपूर. ”

नोटीस वाचून झाल्यावर मीं सुलूकडे पाहिलं. ती म्हणत होती : “ कसं आहे गंगूनानांचं उलटीचं औषध ! अगदीं रामबाण ! ”

# ८. हितचिंतक

ही दुनिया भल्याची नाहीं, हेंच खरं. ह्या जगांत कधीं कुणावर उपकार करण्याच्या भानगडींत पडूं नये. अगदीं एखादा माणूस पाण्यांत बुडत असला, आणि आपण पट्टीचे पोहणारे असलों, तरी आपण पाण्यांत उडी टाकूं नये. चक्क आपणाला पोहतां येत नाहीं, म्हणून सांगावं.

अशी दुसऱ्यावर उपकार करण्याची मला एक वाईट खोड होती. लग्न झालेल्या जोडप्यांचे संसार सुखानें चालावेत, नवराबायकोनीं एकमेकांची कदर करावी, आणि एकमेकांना सुखांत ठेवण्याची कोशीस करावी, ह्याच उदात्त आणि परोपकारी हेतूनं माझी नेहमीं खटपट असायची. सुदैवानं माझी ' ही ' हि माझ्या ह्या सत्कार्यांत तत्परतेनं मदत करणारी अशी पत्नि मला मिळालेली होती. आमचा संसार आज वीस वर्षं सुखानं चाललेला होता. मी स्वतःला आदर्श पति समजत होतों. मला सुपारीच्या खांडाचंहि व्यसन नव्हतं, आणि आमचा संसार म्हणजे नवपरिणितांनीं गिरवण्यासारखा एक कित्ता होता. आतांपर्यंत आपल्या बायकांची नीट कदर न करणाऱ्या कितीतरी नवरोजींना आम्ही वठणीवर आणलं होतं. ह्या गोष्टीचा आम्हांला मोठा अभिमान वाटे. त्याचप्रमाणें आम्ही आमच्या शेजाराला नुकत्याच आलेल्या शरच्चंद्रालाहि वठणीवर आणलं होतं, आणि त्याच्या नवीनच चालू झालेल्या संसाराची गाडी नीट रुळावर आणून सोडली होती. पण शरच्चंद्र किती कृतघ्न पहा ! त्यानं आमचे हे त्याच्यावर झालेले डोंगरायेवढे उपकार अजिबात विसरून, उलट मलाच टांग मारली. असे हे लोक कृतघ्न असतात. पूर्वी देखील ज्यांचे ज्यांचे

संसार आम्ही सुखाचे केले होते, त्यांतील बहुतेकजण जरी आमच्याविषयीं कृतज्ञता दाखवीत असले, तरी मनांतून ते आमच्यावर चिडूनच च असावेत, अशी आतां मला पूर्वींचे कांहीं प्रसंग नीट आठवल्यावर शंका येऊं लागली आहे. तें कांहीं असो. ह्यापुढं तर आपण अगदीं कानाला खडा लावला आहे, कीं हे अलिकडचे नवराबायको मरेनात का तिकडे, आपण आपल्या घराच्या बाहेर म्हणून पहायचं नाहीं; ज्याचं करावं भलं तो म्हणतो आपलंच खरं!

आम्ही ज्या घरांत राहत होतों, त्या घरांत दोन बिऱ्हाडांची सोय होती. पुढल्या बाजूला एक मोठा हॉल होता, आणि एक लांकडी पार्टीशन घालून त्याची फाळणी करण्यांत आली होती. त्या हॉलच्या ह्या दोन्ही तुकड्यांचा उपयोग प्रत्येक बिऱ्हाडाला दिवाणखान्याप्रमाणेंच होई. एकीकडचं बोलणं दुसरीकडे सहज ऐकू जात असल्यामुळें दोन्ही बिऱ्हाडांत एक प्रकारचा घरोबा आपोआपच उत्पन्न होई. आम्ही जें नवऱ्यांची सुधारणा करण्याच सत्कार्य आमच्या शिरावर घेतलेलं होतं, त्या दृष्टीनंहि ही परिस्थिति आम्हाला पुष्कळच सोयीस्कर पडे.

आतांपर्यंत आमच्या शेजारच्या बिऱ्हाडांत पाचसहा नवपरिणित जोडपीं राहून गेलीं होतीं. चारसहा महिन्यांच्यावर ह्या बिऱ्हाडांत कोणी टिकतच नसे. त्या बिऱ्हाडाच्या काय विशिष्ट अडचणी होत्या, कोण जाणे. पण, ह्या चारसहा महिन्यांत त्या जोडप्यांतल्या नवरोजीला आपल्या नवऱ्याच्या कर्तव्यांची व त्यांच्या अल्लड बायकांना आपल्या पत्नित्वाच्या हक्कांची जाणीव आम्ही करून देऊं शकलों होतों, येवढंच आम्हांला समाधान होतं. जणूं काय, आमच्याकडून हा कोर्स घेण्याकरतांच हीं जोडपीं आमच्या शेजारीं येऊन चारसहा महिने राहत, आणि आपल्या कर्तव्यांची ओळख पटली कीं मोठ्या आनंदानं आमचा निरोप घेऊन निघून जात.

बरेच दिवस आमच्या शेजारची ही जागा रिकामी पडली होती. आतां कोठल्या नव्या जोडप्याचा संसार सुरळीत चालू करून देण्याची जबाबदारी आमच्यावर येऊन पडते, ह्याविषयीं आम्ही आश्चर्य करीत होतों. इतक्यांत एक दिवस शरच्चंद्र आपल्या नुकत्याच तारुण्यांत पदार्पण केलेल्या बायकोला घेऊन तिथं राहावयास आला.

शरच्चंद्राकडे, सिंधूकडे आणि त्यांच्या सामानसुमानाकडे पाहतांच मी ओळखलं कीं आमच्या शेजाऱ्यांना जे धडे आम्ही देत होतों, त्यांतलं 'गमभन' देखील त्यांना ठाऊक नसाव! नुकतीच रेशनिंग ऑफिसांत नोकरी लागलेला तो एक इन्स्पेक्टर, पण त्याचा रुबाब पहा कसा! एक लांकडाचा नक्षीदार पलंग, भारीपैकी सोफासेट, चामड्याच्या सूटकेसेस, एक भला मोठा रेडियो आणि फरेम केलेलीं सुंदर बायाची चित्रं, असं दोन गाड्या भरून त्याचं फर्निचर होतं. सिंधू एक भरजरी लुगडं काय नेसली होती, आणि शरच्चद्रानं मारे पंडित जवाहरलाल नेहरूंची ऐट काय आणली होती! जणू काय, त्यानं एखाद्या सरकारी ऑफिसांत तीसएक वर्षं हेडक्लार्कची नोकरी केली होती, आणि आतां तो पेन्शनीला आला होता. मी आपला सहज शेजारधर्माला अनुसरून—हो, आम्ही आपलीं बालबोध वळणाचीं माणसं, रीतभात कांहीं आम्ही अजून सोडलेली नाहीं!—काय पाहिजे, काय नको ह्याची विचारपूस करण्याकरतां गेलों, तर बेट्यानं एकदम मला, "हॅल्लो, सो यू आर अवर नेबर!" (हॅल्लो, तर मग तुम्ही आमचे शेजारी!) असं अस्सल इंग्रजीत विचारलं, आणि त्याच्या आणि माझ्या वयांतील अंतराचा यत्किंचितहि विचार न करतां, आपल्या खिशांतून एक नखरेबाज चांदीची सिगारेट केस काढून त्यानं ती चक्क माझ्यासमोर कीं हो धरली!

आमचा तर्क चुकला नाहीं. ज्याला आपणापेक्षां वयानं अधिक अस-

लेल्या गृहस्थाचा मान कसा ठेवावा हें कळत नाहीं, त्याला आपण जी पतित्वाची जबाबदारी शिरावर घेतलेली आहे, त्या जबाबदारीचा अर्थ पुरतेपणी न उमगल्यास, आणि आपल्या बायकोलाहि कांहीं भावना असतात, तिलाहि कांहीं आशा–आकांक्षा असतात, ह्याची जाणीव नसल्यास त्यांत आश्चर्य करण्यासारखें कांहींच नव्हतं! असल्या बेछूट, खुशालचेंडू माणसाशीं लग्न केल्यावर कुठलीहि मुलगी सुखी होणें शक्य नाहीं, ह्याविषयीं आम्हांला मुळींसुद्धां संशय नव्हता.

आम्हीं आठपंधरा दिवस आमच्या ह्या नवीन शेजाऱ्यावर नीट नजर ठेवली. शरच्चंद्राच्या बेछूट वागणुकीमुळं सिंधू सुखी नसलीच पाहिजे, अशी आमची अपेक्षा होती. पण ह्या अलिकडच्या मुलीहि जरा विचित्रच असतात. एवढया इंग्रजी शिकतात, फुटाण्यासारख्या फाड्फाड् बोलतात, बगलेंत जाडेजुडे ग्रंथराज घेऊन फिरतात, पण त्यांना आपल्या नवऱ्याला मुठींत ठेवण्याची कला काहीं माहीत नसते. नवऱ्यानं पावडरीला, पातळांना पैसे दिले की ह्या खूष. ह्यापेक्षां अधिक कशाची पत्नीनं नवऱ्याकडून अपेक्षा करायची असते, ह्याची त्यांना कल्पनाच नसते. अर्थात् सिंधूहि ह्या नियमाला अपवाद नव्हती. शरच्चद्र बेछूट, बेजबाबदारपणानं वागत होता, पण तरीहि सिंधू सुखी दिसत होती! गुलामांना गुलामगिरींतच मौज वाटावी, तसाच काहीसा सा हा प्रकार होता. आतां सिंधूला आपल्या पत्नित्वाच्या हक्काची जाणीव करून देण्याचं खडतर काम आमच्या शिरावर येऊन पडलं होतं. भयंकर मोठी आणि नाजुकच जबाबदारी होती ती. ह्या जबाबदारीनं दुसऱ्या कोणाची छातीच दडपून गेली असती. पण आम्हांला ह्या कार्याचा चांगलाच अनुभव असल्यामुळं, आम्ही जरा आत्मविश्वासानंच ह्या कार्याला लागलो.

सिंधूला आम्हीं प्रथम 'इन्डायरेक्ट मेथड' नं (अप्रत्यक्ष पद्धतीनं),

धडे द्यावयास सुरुवात केली. मी आणि आमची ही हॉलमधल्या त्या लांकडी पार्टिशनजवळ दोन खुर्च्या घेऊन बसत असूं, आणि रंगभूमीवरील पात्रं ज्याप्रमाणें 'एकीकडे' पण नाटकगृहांतील सर्व प्रेक्षकांना ऐकूं जाईल एवढ्या मोठ्यानं बोलण्याची काळजी घेतात, त्याप्रमाणं शेजारच्या हॉलमध्यें एखादं भावगीत गुणगुणत बसलेल्या सिंधूला स्पष्ट ऐकूं जाईल एवढ्या मोठ्या आवाजांत आम्हीं त्यांच्या संसारावर आपसांत चर्चा करीत असूं.

"आज शरच्चंद्रांना चहाला बोलवावं म्हणतों." मी म्हणालों.

"होय बाई—माझाहि किती दिवसांपासून तोच विचार होता"—ही.

"मग बोलावू या तर!"

"पण ते आहेत कुठं इथं!"

"इथ नाहींत! मग गेलेत कुठं?"

शरच्चंद्र दर शनिवारीं-रविवारीं मुंबईला चक्कर टाकीत असे. आणि आज तो इथं नाहीं, हें पूर्ण ठाऊक असूनहि, आश्चर्याच्या स्वरांत मी विचारलें,

"मुंबईला!"

"मुबईला? दर शनिवारीं मुंबईला काय काम असतं ह्यांचं?"

"काय कीं, कुठल्याशा दुकानांत त्यांची भागीदारी आहे म्हणे, आणि हिशोब पहायला त्यांना जावं लागतं, असं सिंधूबाई म्हणत होत्या!"

"हिशोब पहायला दर आठवड्याला—महिन्यांतून चारदां जावं लागतं? माझी समजूत होती, वर्षांतून फार तर दोनदां हिशोब करतात. आणि हें काम साध्या अर्धा आण्याच्या कार्डानं होण्यासारखं आहे. त्याकरतां मुंबईलाच जायची जरूर काय?"

"काय जाणं बाई!"

"मी सांगतों!" इतक्या वेळांत सिंधूचं भावगीत बंद झालं होतं. आतां तिनं आमच्या संभाषणाकडे कान लावलेले असलेच पाहिजेत, असा विचार करून मी हलक्या स्वरांत म्हणालों, "इथं कांहींतरी भानगड आहे. दर शनिवारीं शरच्चंद्र मुंबईला जातात, त्याचं कारण दुसरंच कांहींतरी असलं पाहिजे! त्या हिशोबाच्या वगैरे साऱ्या थापा आहेत."

"काय कारण असलं पाहिजे?"

"काय असणार?"

"मला नाहीं वाटत शरच्चंद्र तशांतले असतील म्हणून!"

ह्यावर मी कांहीं उत्तर दिलं नाहीं. पण मी 'तुला नाहीं कळायचं तें!' अशा अर्थानं खांदे उडवलेले सिंधूच्या डोळ्यांना त्या लांकडी पार्टिशनमधूनहि स्पष्ट दिसावेत, अशा तऱ्हेनं 'हं!' म्हणून हंसलों. नंतर थोड्याच दिवसांत सिंधूला आम्हीं दुसरा पाठ दिला.

"रात्रीं बाहेरचा दरवाजा उघडाच होता!"— ही.

"कां?"—मी.

"शरच्चंद्र यायचे असतात ना?"

"कुठं जातात ते रोज रात्रीं?"

"काय जणं! पण ब्रिज खेळायला जातात, नाहीतर कधीं मित्रांबरोबर सिनेमा पहायलाहि जातात, असं सिंधूबाई म्हणत होत्या."

"घरीं अशी तरणीताठी बायको एकटी सोडून?"

"एकटी कशी? आपली सोबत आहे ना त्यांना."

"आपली सोबत! अगदीं भोळी आहेस तूं. अग, नुकतंच लग्न झालेलं. आणि नवरा आपल्या बायकोला सोडून रात्रीचा इतका वेळ ब्रिज खेळत राहील?"

"त्यांना म्हणे ब्रिजचं वेड आहे, आणि मधून मधून सिनेमालाहि जातात म्हणे!"

"जावं सिनेमाला. जाऊं नये, असं नाहीं मी म्हणत. पण मग बायकोला बरोबर घेऊन जायला काय हरकत आहे? नवीनच लग्न झाल्यावर बायकोला घेऊन जाऊं नये माणसानं?"

"सिंधूबाईंना सिनेमांची तितकीशी आवड नाहीं म्हणे!"

"नवऱ्यानं सिनेमाला नेलं नाहीं म्हणजे त्या तसं म्हणणारच."

"बाकी हें ब्रिजचं वेड भारीच वाईट!"

"ब्रिजच वेड आहे कीं आणखी कसलं आहे, देव जाणे!"

ह्याप्रमाणें आम्हीं सिंधूला अप्रत्यक्षपणें धडे देऊन तिच्या हक्कांची जाणीव करून देऊं लागलों, आणि सांगण्यास आनंद वाटतो कीं, सिंधूहि फारच चलाख विद्यार्थिनी आम्हांला मिळाली होती. ती आली तेव्हां एखाद्या फुलपांखरासारखी ती बेबंद आनंदी दिसत होती. शरच्चंद्राच्या आणि तिच्या शेजारच्या हॉलमध्यें गप्पागोष्टी चालू असतांना शरच्चंद्रानं एखादी कोटी केली कीं तिच्या मनमोकळ्या हास्यानं लाकडी पार्टिशनला हादरे बसत. ती आल्यापासून तों आम्हीं तिला धडे द्यायला सुरुवात करीपर्यंत, तिचं वजन चारपांच पौंडांनीं तरी खासच वाढलेलं असावं. सोमवारी पहांटे शरच्चंद्र मुंबईहून आला कीं ती त्याचं प्रेमानं स्वागत करीत असे. तो ब्रिज खेळून किंवा सिनेमाहून येईपर्यंत ती जेवणासाठीं त्याच्याकरतां ताटकळत बसून राहत असे. पण आम्ही धडे द्यावयास सुरुवात केल्यापासून पंधरा दिवसांच्या आंतच तिच्यांत दिसून येण्याइतका फरक पडला. ती आतां पूर्वीसारखी आनंदी दिसत नसे. तिला हंसतां येतं की नाहीं, अशी शंका उत्पन्न व्हावी इतक्या प्रमाणांत तिचं हास्य आतां बंद पडलं होतं. शरच्चंद्र मुंबईहून आला कीं त्याचं स्वागत ती आतां रागानंच करूं लागली होती. तो रात्रीं ब्रिज खेळून

आला कीं ती त्याला थंडींतच हांका मारीत तासभर तरी कोकलत ठेवी. पूर्वीं तारस्वरांत चाललेला त्यांचा हास्यविनोद आम्हांला ऐकूं येत असे. पण अलीकडे आम्हांला कांहीं ऐकूं आलंच तर हलक्या आवाजांतली त्यांची धुसफुस तेवढी ऐकूं येत असे.

एका शनिवारीं आमच्या हिला मी सिनेमाला घेऊन गेलों. मी बाळबोध घराण्याचा होतों, आणि नवराबायकोनं सिनेमाला एकत्र जाऊन बसणं मला तितकंसं पसंत नव्हतं. नेहमीं नाटक–सिनेमा मी एकटयानंच पाहत असें. पण सिंधूला नवराबायकोमधल्या प्रेमाचं प्रात्यक्षिक दाखवावं ह्या उदात्त हेतूनं मी तो कार्यक्रम पार पाडला होता.

दुसऱ्या दिवशीं एका वाटींत लोणच्याच्या दोनचार फोडी घेऊन ही सिंधूकडे गेली. रविवार असल्यामुळं शरच्चंद्र मुबईंतच होता.

ही म्हणाली, " कालचा सिनेमा फारच सुरेख होता बाई ! "

सिंधूचा सुस्कारा मला स्पष्ट ऐकूं आला.

" तुम्हीहि पहा हो शरच्चंद्र आले म्हणजे एकदां. बाकी दाखवलाच असेल म्हणा त्यांनीं तुम्हांला ! तुम्ही नव्या पिढींतली माणसं ! "

सिंधूनं आणखी एक सुस्कारा सोडला.

" फारच सुखी आहांत बाई तुम्ही ! " ही म्हणाली, " शरच्चंद्र तुम्हांला चांगलीं चांगलीं पातळं आणून देतात, पुस्तकं वाचायला आणून देतात, काम झालं कीं दिवसभर रेडियो ऐकत बसावं–असा चेहरा का झालाय् तुमचा ? बरं नाहीं का तुम्हांला ? डोकं बिकं तर नाहीं ना दुखत ? "

" डोकंच दुखतंय् ! "

" मग अमृतांजन चोळूं का जरा ? "

" नको–मी झोपतें जरा. मग बरं वाटेल मला ! "

येवढं संभाषण झाल्यावर, ही विजयी मुद्रेनं परत आली. तिच्या पाठोपाठ जें ऐकून, आमचा शिष्य आम्हीं देत असलेले धडे तोंडपाठ करीत असल्याचा आम्हांला पुरावा मिळावा आणि आनंद व्हावा, असे आवाज आमच्या कानांवर येऊन पडले.

सिंधू स्फुंदून स्फुंदून हुंदके देत होती. नंतर आम्हीं सिंधूला धडे देणं बंद केलं. फक्त पुढीलप्रमाणं आम्ही तिला तिच्या अभ्यासाच्या थोड-क्यांत उजळण्या देत असूं.

"शरच्चंद्र कालहि उशिरां आले का ?" मी.

"हो सिंधूताईंना बरं नाहीं. तरी त्यांनीं इतका उशीर करून घरीं येणं बरं का ?" ही.

"जाऊं दे; आपल्याला काय करायच्या दुसऱ्याच्या उठाठेवी! नवराबायको आपलं पाहून घेतील!"

"होय बाई ! आपण कशाला उगाच दुसऱ्याच्या संसारांत लुडबुड करा; कसंहि करून ते सुखी असले म्हणजे झालं. आपल्याला काय?"

"होय, आणि शरच्चंद्र चांगले येवढे शिकलेले, त्यांना का कळत नाहीत आपल्या बायकोच्या भावना ? जाऊं द्या ! आपल्याला काय करायच्या आहेत ह्या नसत्या उचापती ? आपण बरे कीं आपला संसार बरा !"

पुढच्याच शुक्रवारीं रात्रीं शेजारच्या बिऱ्हाडांतून अगदीं हलक्या आवाजांत चाललेला संवाद आम्हांला ऐकूं आला, आणि आमच्या कानांचं पारणं फिटलं. नवाच्या सुमारास आम्ही आमच्या घरांतील दिवे काढले होते, आणि आम्ही केव्हांच झोपीं गेलों आहोंत असा आभास उत्पन्न करण्याइतकी सामसूम आमच्या घरांत नांदत होती. साहजिकच आमच्या शेजारचं जोडपं जरा गाफील राहिलं होतं; आणि नवराबायकोमधील भांडणं जेवढी सावधगिरी राखून करायचीं

असतात तेवढी सावधगिरी त्यांनीं बाळगलेली नव्हती. आमचा श्वास आम्ही रोखून धरला होता, आणि पार्टिशनला आमचे कान घट्ट चिकटवून आम्ही अंधारांत उभे होतों. आमच्या कानांवर पुढील संवाद येऊन पडला.

" उद्यां दुपारच्या गाडीनं मुंबईला जाईन म्हणतों. " शरच्चंद्र.

" काय असतं हो तुमचं मुंबईला काम, इतकं दर आठवड्याला जाण्यासारखं ? " सिंधू.

" म्हणजे ? दुकानांत भागेदारी आहे ना माझी ! " शरच्चंद्र.

" म्हणून काय दर आठवड्याला गेलंच पाहिजे ? " सिंधू.

" हिशोब नकोत का पाहायला ? " शरच्चंद्र.

" दर आठवड्याला कोण हिशोब करतं ? हिशोब दर सहामाहीला करतात. " सिंधू.

" कुणी सांगितलं तुला ? " शरच्चंद्र.

" शेजारच्या बंडोपंतानीं. " सिंधू.

" त्यांना काय कळतंय् व्यापारांतलं ? सारा जन्म कारकुनी करण्यांत गेला त्यांचा ! " शरच्चंद्र.

" त्यांना कशाला नांवं ठेवतां ? फारच चांगलीं माणसं आहेत तीं. तीं आहेत म्हणूनच अशी मी ह्या घरांत रात्रीच्या रात्री एकटी घालवतें. ते जाऊं द्या. उद्यां नाहीं जाऊं देणार मी तुम्हांला ! " सिंधू.

" हा गहजबच झाला ! " शरच्चंद्र.

" ह्या तुमच्या थापा का मला कळत नाहींत ! " सिंधू.

" थापा ! " शरच्चंद्र.

" होय थापा. म्हणे हिशोब करायचे असतात! तिथं मुंबईला असेल तुमची दुसरी कोणी ? "– सिंधू.

" सिंधू, काय बोलतेस तूं हें ? " शरच्चंद्र.

" सगळे लोक असंच म्हणतात ! "–सिधू.

" लोकांशीं काय करायचंय् आपल्याला ? " शरच्चंद्र.

" आपल्या शेजारचेदिखील असंच म्हणतात. त्यांना तोंड दाखवायला देखील लाज वाटते मला ! "

" पण ह्यांना कोणी सांगितल्या आहेत दुसऱ्याच्या उठाठेवी ! त्यांनीं आपलं ' हरि हरि ' करत बसावं आतां. आणि लोकांचं काय ऐकतेस तूं ? " शरच्चंद्र.

" आपले दर शनिवारीं उठले कीं चालले मुंबईला. रोज रात्रीं गेले ब्रिज खेळायला. ब्रिजच खेळतां कीं आणखी कांहीं करतां देव जाणे ! "

" सिधू, कांहीतरी संशय घेतेस तूं ! "

" कधीं मला बरोबर फिरायला नेलंय्–सिनेमा दाखवलाय् ! शेजारचे बंडोपंत पहा. येवढं वय झालंय् पण मथुराबाईंना सिनेमाला घेऊन जातात ! तुम्हांलाच मी आवडत नाहीं. मग लग्न तरी कशाला केलंत् ? "

" सिधू ! "

" माझं नशीबच खोटं मेलीचं ! "

मी आनंदानं हिच्याकडे पाहिलं. तिनंहि माझ्याकडे त्याच दृष्टीनं पाहिलं असावं, पण तें मला अंधारांत दिसूं मात्र शकलं नाहीं.

नंतर शेजारच्या घरांत बरीच रडारड झाली, कृतकृत्य होऊन आम्हीं झोंपीं गेलों.

शनिवारीं संध्याकाळीं मी शरच्चंद्राची सारखी वाट पाहत होतों. तो ऑफिसमधून येतांच मी त्याला विचारलं, " काय, आज मुंबईला चक्कर नाहीं वाटतं ? "

" नाहीं ! " तो दांतओंठ खाऊन म्हणाला.

मी मनांतल्या मनांत हंसलों आणि म्हणालों, "मग तुमचे हिशोब?"

तो कांहीं न बोलतांच घरांत निघून गेला.

आतां त्यांचा संसार सुरळीत चालला होता. शरच्चंद्राची मुंबई सुटली. रात्रीचं ब्रिजहि बंद झालं. तो सिंधूला घेऊन फिरायला, सिनेमाला जाऊं लागला. माझ्याशीं प्रथम प्रथम तो रागानं वागे, पण नंतर तो चांगला वागूं लागला. मला वाटलं, त्याचा संसार सुखाचा करून देण्याचे जे उपकार आम्हीं त्याच्यावर केलेले होते, त्याविषयीं त्याला कृतज्ञता वाटत असावी.

शरच्चंद्र रेशनिंग इन्स्पेक्टर असल्यामुळं तो आम्हांला मधून मधून साखर, तांदूळ, गहूं वगैरे जिनसा स्वस्त किंमतींत किंवा फुकटांतहि आणून देई. सिंधू स्वयंपाकांत असतांना कधीं तो माझ्याकडे येऊन मोकळेपणानं गप्पाहि मारी. त्याची सुधारलेली वर्तणूक पाहून आम्हांलाहि त्याच्याविषयीं एक प्रकारची आपुलकी वाटूं लागली होती.

एक दिवस असाच तो आमच्याकडे आला. मी आणि ही संसाराच्या गोष्टी करीत बसलों होतों. एका खुर्चीवर तो आरामशीरपणानं बसला मग त्यानं खिशांतून आपली ती नखरेबाज चांदीची सिगारेटकेस काढली. त्यानं बोलतां बोलतां सहज ती डबी माझ्यासमोर उघडी करून धरली.

"छे! मी ओढत नाहीं सिगारेट. मला कसलंच व्यसन नाहीं!" मी म्हणालों.

"अरे हो. खरंच!" हिच्याकडे एक चोरटा दृष्टिक्षेप टाकून तो उद्गारला. आणि मग हंसतहंसत पुन्हां म्हणाला, "तुम्ही सिगरेट ओढत नाहीं, हें माझ्या लक्षांतच नाहीं राहिलं!"

आणि मग तो कांहीं कारण नसतां पुन्हां हंसला.

त्याच्या ह्या विचित्र वागणुकीचा मला अर्थच कळेना.

नंतर ही चहा ठेवायला आंत गेली. तेव्हां तो हलक्या आवाजांत बोलण्याचा आव आणून पण 'हि 'ला स्पष्ट ऐकूं जाईल अशा रीतीनं म्हणाला, "बाटली आणून ठेवली आहे तुमच्याकरतां !"

"कसली ?" मीहि हलक्या आवाजांत विचारलं.

"घासलेट हवं होतं ना तुम्हांला ?" आतां मात्र तो हिला ऐकूं जाणार नाहीं, इतक्या हलक्या आवाजांत म्हणाला, "घेऊन या आज." नंतर गुप्ततेचा आव तसाच कायम ठेवून पण पुन्हां आवाज मोठा करून तो म्हणाला, "पण गुपचुप हो. कुणाला समजलं तर मधल्यामध्यें माझी कंबक्ती ! —कुणाला वासबिस यायचा !"

मी सांगून ठेवल्याप्रमाणें माझ्याकरतां त्यानं बाटलीभर घासलेट आणून ठेवलंय् ह्याचा मला आनंद झाला, आणि त्या भरांत त्याच्या ह्या आवाजाच्या भरतीओहोटीकडे मी विशेष लक्ष दिलं नाहीं.

थोड्याच वेळांत ही चहा घेऊन बाहेर आली. चहा पितांपितां एकदम आठवल्यासारखं करून शरच्चंद्र म्हणाला, "हो खरंच, बंडोपंत? काल तुम्ही नाटकाला नाहीं दिसलांत ते कुठं ? तुम्ही येणार होतां ना ?"

काल रात्रीं मी नाटकाला एकटाच गेलों होतों, आणि पहांटे पांचाला आलों होतों. पुढल्या रांकेंत खुर्च्यांवर ऐटींत बसलेल्या शरच्चंद्राला आणि सिंधूला मी पाहिलं होतं. मधल्या वेळेंत मी त्याला भेटलोंहि होतों. येवढंच नव्हे तर त्यानं मला चहाहि पाजला होता. येवढं सग ळं असूनहि त्यानं असा प्रश्न विचारावा, ह्याचं मला आश्चर्य वाटलं. मी तर त्याचे हे अगदींच अनपेक्षित प्रश्न ऐकून गोंधळूनच गेलों. मीं म्हणालों, "कुठं ? नाटकाला ?"

"हो. नाटकाला. तुम्ही येणार होतां ना ? पण कुठं दिसलां नाहींत ते? ऐन वेळीं कार्यक्रम रद्द केला वाटतं. आम्ही गेलों होतों नाटकाला."

"नाटकाला ना ? काल रात्रीं ना ? मी गेलों होतों ना !"

" तुम्ही आलां होतां ? " आश्चर्य दाखवून त्यानं विचारलं. " मग दिसलां नाहींत ते कुठं ! "

" वा ! मधल्या वेळांत भेट नाहीं का झाली आपली ? "

" मधल्या वेळांत ? "

" हो. मधल्या वेळांत. पहिल्या आणि दुसऱ्या अंकाच्या मध्यें."

" अं ? अरे हो. भेटलों खरे आपण मधल्या वेळेंत. हो. पहिल्या आणि दुसऱ्या अंकांच्या मधें. खरंच भेटलों होतों आपण. " हिच्याकडे किंचित् हंसून पाहत तो म्हणाला.

" आणि आपण चहाहि नाहीं का घेतला ? "

" हो खरंच. विसरलोंच होतों मी. हो. आतां आठवलं. आपण पहिल्या आणि दुसऱ्या अंकांच्यामधें भेटलों होतों. आणि चहाहि घेतला. हो, तुम्ही एक कप आणि मी एक कप. आतां आठवलं सारं. फक्कड होता नाहीं चहा ? "

मग आम्ही नाटकावर चर्चा केली. चर्चा करतांना माझी आणि त्याची अभिरुचि भिन्न असल्याचं मला कळून आलं. येवढंच नव्हे तर, निरनिराळ्या भूमिका करणाऱ्या नटांच्या नांवांविषयींहि प्रथम आमच्यांत मतभेद असलेला दिसून आला होता. नंतर मग त्यानं माझं म्हणणं लवकर लवकर कबूल केलं म्हणा—

पण एका गोष्टीचं मला आश्चर्य वाटलं. आमची चर्चा चालू असतां ही जरा फणकाऱ्यानंच उठून गेलेली मला दिसली. तिचा चेहरा रागीट दिसत होता. डोळ्यांतून ती माझ्यावर आग पाखडीत होती. असं एकदम रागवायला तिला काय कारण झालं असावं, ह्याविषयीं शरच्चंद्र जाईपर्यंत मी आश्चर्य करीत राहिलों.

तो गेल्यावर तिच्या रागाचं कारण शोधण्याकरतां मी आंत गेलों. बराच वेळ माझ्या पृच्छांना आणि मनधरणीला तिनं दादच दिली

नाहीं. एखाद्या शापामुळं ती मुकी तर झाली नाहीं ना, अशी शंका माझ्या मनांत येते आहे तों ती माझ्यावर एकदम कडाडली, "तुम्ही लुच्चे आहांत—अगदीं एक नंबरचे लुच्चे आहांत! सारा जन्म तुम्ही मला फसवत आलां!—"

"अग हळूं बोल!" मी जरा घाबरून म्हणालों, "शेजारीं ऐकूं जाईल ना!"

"जाईना का मेलं. शेजाऱ्यांनाच काय पण साऱ्या गांवाला जाऊन सांगतें मी, कीं तुम्ही लुच्चे आहांत, व्यसनी आहांत, बदफैली-बाहेरख्याली आहांत!" ती चिडून म्हणाली.

"अग, काय म्हणतेस तूं हें?" मी समजुतीच्या स्वरांत विचारलं, "पुराव्याशिवाय काय उगीच आकांडतांडव चालवलं आहेस?"

"पुरावा? आजच मिळाला मला सारा पुरावा! तुम्ही सिगरेट ओढतां!"

"मी सिगरेट ओढतों?"

"होय, तुम्ही सिगरेट ओढतां हें शरच्चंद्राला ठाऊक आहे. माझ्या पाठीमागं तुम्ही त्याच्याबरोबर ओढल्याहि असतील, म्हणून त्यानं तुम्हांला आल्याबरोबर सिगरेट देऊं केली. पण माझ्यासमोर तुम्ही सिगरेट ओढत नाहीं हें त्याच्या नंतर लक्षांत आलं, आणि मग त्यानंहि सारवासारव केली."

"अग तसं नाहीं—मी खरंच कधीं सिगरेटला शिवलोंहि नाहीं. मी अगदीं निर्व्यसनी आहें!"

"निर्व्यसनी! हूं! दारुडे!"

"दारुडे?"

"हो, तुम्ही पितांहि!"

"कांहीं तरी भलतंच—"

" गप्प बसा ! करूनच्या करून वर असं बोलायला धीर तरी कसा होतो बाई माणसाला ! तुम्हांला वाटत असेल मी कानांत बोळेच घातलेत ! पण सारं कळतं हो मला. शरच्चंद्रानं तुमच्या करतां बाटली आणून ठेवलीय् ती हो कसली ? म्हणे गुपचुप–कुणाला वासबिस यायचा ! "

" ह्यें ! ह्यें ! अग तें घासलेट ! "

" मला जाळायला आणलं असेल तें घासलेट! घासलेटच्या गोष्टी घरांतल्या घरांत येवढ्या गुप्तपणानं बोलायची हो काय जरूरी ? "

" खरंच सांगतों..."

" कांहीं सांगायची जरूरी नाहीं. इतके दिवस फसवलं, पण आत मीं फसायची नाहीं. सिगारेट पितां—दारू पितां—आणि वर निर्लज्जपणानं आपल्या बायकोसमोर आपल्या निर्व्यसनीपणाचा टेंभा मिरवितां! "

" अग पण—"

" आणि काल नाटकाला जातों म्हणून थाप मारून कुठं हो गेलां होतां ? इतके दिवस एकट्यानंच नाटकाला जातां, तें अशींच नाटकं करायला नाहीं का ? कुठं गटारींत शेण खाऊन आले रात्रीं ?—आणि दुसऱ्यांना शिकवायला निघालेत मारे बायकोला कसं सुखांत ठेवावं तें—दुष्ट !—कसाई !—"

शेजारच्या घरांत शरच्चंद्राला एकदम कंठ फुटला होता, आणि मोठ्या खुषींत येऊन तो कुठलं तरी एक भेसूर गाणं गात होता—

---

# १. बेवकूफ

" सलाम अलेकुम्. " मी म्हणालों.

" अलेकुम् सलाम. " शेखसाहेब म्हणाले.

" क्यूं शेखसाब ?" मी शेखसाहेबांना म्हणालों, "हमकू उर्दू शिकाबेंगे—पढायेंगे क्या ?"

" बहोत खुषीसे. "

" शुक्रिया," मी म्हणालों. हिंदी सिनेमापासून इतर कांहीं शिकण्यासारखं नसलं, तरी हा येवढा आभार-प्रदर्शक उर्दू शब्द मी शिकलों होतों व आपणाला उर्दू येतं हें दाखविण्याकरितां त्याचा उपयोग करण्याची एकहि संधि मी वायां दवडीत नव्हतों.

" उर्दू याने उर्दू लिपि-उर्दू लेटर्स ?" मी म्हणालों.

" हाँ, हाँ, बहोत खुषीसे. " आपल्या फोंफावणाऱ्या दाढीला कुरवाळीत शेखसाहेब म्हणाले, " उर्दू पढो और फिर कुरानशरीफभी पढो. "

" हाँ,—बराबर पढेंगे. "

" सब दुनियाके धरममें हमारे इस्लामका पहिला नंबर है. तुम कुरानशरीफ पढेंगे तो दूसरा तुमारा वेद, बैबलबिईबल कुछ् नहि पढेंगे. सबसे अच्छा हमारा कुरानशरीफ है. "

" दूसरे धरमगरंथ तुम्हने पढे है ?"

" कुरान इतना अच्छा है की दूसरा धरमगरंथ पढनेकी जरूरतहि क्या ?"

" शुक्रिया ! " मी म्हणालों. " कबसे पढायेंगे उर्दू? कलसे आवेंगे?"

" हाँ, हाँ."

" शुक्रिया. " मी म्हणालों, " कल सकालकू-आती सुबेरे दस बजे आव. "

" बिलकुल ठीक ! –हाँ, आपका बंड्या कैसा है ?"

" ठीक ठीक–शुक्रिया ! " आतां मात्र ह्या शब्दाचा योग्य उपयोग करावयास मिळाला म्हणून मी जरा आनंदानं म्हणालों.

शेखसाहेबांशीं बोलतांना मी नेहमीं हिंदी, हिंदुस्थानी किंवा उर्दु ह्यांपैकीं जमेल त्या भाषेंत बोलत असें. कुठं अडखळलों तर इंग्रजीची मदत घेत असें. आणि अगदीच नाइलाज झाला तर मराठीवर भागवून घेत असें. शेखसाहेबांना मराठी येत नव्हतं अशांतला भाग नव्हता. पिढ्यान् पिढ्या त्यांनीं महाराष्ट्रांतच काढल्या होत्या. उत्तर हिंदुस्थानची हवा थंड कीं गरम हें देखील त्यांना ठाऊक नव्हतं. तसं पाहिलं तर त्यांची मातृभाषा मराठीच होती, परंतु अलिकडे त्यांच्यांत राजकीय जागृति झाल्यापासून ते कटाक्षानं उर्दूमध्येंच बोलत. उर्दू हीच आपली मातृभाषा आहे असं ते अट्टाहासानं सांगत. मीहि एक सच्चा काँग्रेसवाला असल्यामुळें किंवा तसं बनण्याचा प्रामाणिक प्रयत्न करीत असल्यामुळें त्यांच्याशीं शक्य तों उर्दूतच बोलत असें.

सच्चा काँग्रेसवाला होणं येरा गबाळाचं काम नव्हे. सत्यव्रत राजा हरिश्चंद्र आणि अहिंसावादी बुद्धदेव ह्या दोघांचेहि अवतार त्याच्यांत एकवटलेले असले पाहिजेत. त्याला चरख्यावर, नाहीतर टकळीवर सूत काढतां आलं पाहिजे. तो बहुभाषी असायला पाहिजे. त्याला मातृभाषा म्हणून मराठी किंवा दुसरी एखादी प्रांतिक भाषा आली पाहिजे. राजभाषा म्हणून त्याला इंग्रजी अवगत असलं पाहिजे. काँग्रेसची भाषा म्हणून त्याची गुजारातीशीं जानपछान असली पाहिजे, आणि शेवटीं राष्ट्रभाषा म्हणून त्यानं हिंदुस्तानीचा (म्हणजे संस्कृतप्रचुर हिंदी व अरबी

प्रचुर उर्दू ह्या दोन्ही भाषांचा) पद्धतशीर अभ्यास केला पाहिजे. येवढं झाल्यावर त्यानं उर्दू लिपि शिकली पाहिजे. तुम्ही म्हणाल, तीस कोटी हिंदूंनीं उर्दू शिकण्यापेक्षां सात कोटी मुसलमानांनींच अधिक शास्त्रशुद्ध आणि सुबक असलेली देवनागरी कां शिकूं नये? असा प्रश्न तुम्ही विचारलात कीं तुमचं राजकारणांतलं अज्ञान आणि तुमच्या अंगांत भिनलेली जातीयता मात्र दिसून येईल! तुम्हांला येवढं कळं नये कीं, मुसलमानांना खूष ठेवणं—आपल्या धाकट्या भाईना खूष ठेवणं, त्यांच्या आवडीनिवडी, लहरी सांभाळून घेणं हें सध्याच्या राजकारणांतलं पहिलं सूत्र आहे म्हणून? देवनागरी त्यांनी का शिकावी? त्यांची भाषा आणि संस्कृति दडपण्याचा हा प्रयत्न आहे अशी रास्त शंका त्यांना येईल. त्यांना तसा आग्रह करणं म्हणजे त्यांची भावना दुखावण्यासारखंच नाहीं का? आणि त्यांच्या तशा भावना दुखवल्यानंतर मिळालेलं स्वराज्य टिकणार तरी कसं?

समजा, शेखसाहेबांना मला कांहीं निरोप कळवायचा आहे, त्यांना तो पत्ररूपानंच पाठवायचा आहे. अर्थातच ते तें पत्र उर्दू लिपींतच लिहिणार, आणि त्यांचं तें पत्र—माझ्या प्रिय धाकट्या देशबंधूचं पत्र—मला वाचतां येऊं नये ही केवढ्या नामुष्कीची गोष्ट होईल! शेखसाहेबांचं एक सोडा, पण उत्तर हिंदुस्थानांतले आपले मुस्लीमभाई ज्या लिपींत लिहितात, अरबस्तान व इराण यांमधले आपले मुसलमानभाई ज्या लिपीत लिहितात ती लिपि आपण शिकायलाच नको का?

शिवाय ह्या उर्दू लिपीबद्दल मला लहानपणापासूनच एक प्रकारचं कुतूहल वाटे. अशा नुसत्या वेड्यावांकड्या रेघांच्या लिपींतून कांहीं अर्थ लागणार, लिहितांवाचतां येत असेल ह्याविषयीहि मला कधीं कधीं शंका वाटे. उर्दू लिपींतल्या त्या कट्यारी, तलवारी, सुरे, जंबिये आणि बंदुकीच्या गोळ्या पाहिल्या कीं ही लिपि वाचणारे लोक

'लठवय्ये' आणि येवढ्या तेवढ्या कारणावरून भावना दुखणारे असले तर नवल नाहीं, असाहि विचार कधीं कधीं माझ्या मनाला चाटून जाई. मध्यें मीं एकदोनदां उर्दू शिकण्याचा प्रयत्न करून पाहिला होता तो ह्याच कुतूहलानं. पण आतां मात्र मी देशप्रेमानं प्रेरित होऊन व कांहीं झालं तरी उर्दू लिपींत पारंगत व्हायचंच असा निश्चय करूनच ह्या उद्योगाला लागलों होतों. सुदैवानं मला शेखसाहेबां-सारखा उर्दूचा अभिमानी पंडित शिक्षक म्हणून मिळाला होता.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं शेखसाहेबांच्या घड्याळाप्रमाणें दहा वाजतां पण माझ्या घड्याळाप्रमाणें बाराच्या सुमारास–शेखसाहेब मला शिकवावयास आले, आणि मी अलीफ, बे, पेचे धडे गिरवूं लागलों. एकदोन महिन्यांतच मी उर्दू धडाधड वाचूं लागेन, आणि कधीं वायव्य सरहद्द प्रांतांत राहण्याचा जरी माझ्यावर प्रसंग आला, तरी तो मी ह्या जोरावर निभावून नेऊं शकेन असा मला उत्साह वाटूं लागला.

परंतु माणसानं एखादं पवित्र कार्य हातीं घेतलं तरी तें निर्विघ्नपणें पार पडेलच ह्याचा कांहीं भरंवसा नाहीं ह्याबद्दलची शेकडों उदा-हरणं आपल्या पुराणांतून सांपडतील. ऋषींनीं यज्ञ करायला घ्यावेत आणि त्यांच्यात राक्षसानीं, नाही तर इंद्रानं तरी, व्यत्यय आणावा हा प्रकार अगदी ठरलेलाच होता. तसाच कांहींसा प्रकार माझ्या ह्या उर्दू शिक्षणाच्या बाबतींतहि झाला. आणि मला सांगायला खेद आणि शरम वाटते–अफसोसकी बात है कीं, मी अजूनहि सच्चा आणि शंभर टक्के कॉंग्रेसमन झालों नाहीं !

शेखसाहेबांनीं दिलेला पहिला धडा मी गिरवीत असतां आमचा बंड्या, उमर साल पांच, तिथं हजर झाला, आणि त्यान माझ्या उर्दू शिक्षणांत विघ्न आणण्यास सुरुवात केली. मी कुठं कागदावर 'अलीफ' लिहूं लागलों, तों तो म्हणाला, "बाबा, मला कागद द्या." मी 'बे'

केलं, तों त्यानं माझ्या हातांतली पेन्सिलच काढून घेतली. आणि मी पुरतं 'पे' करतों न करतों तोंच त्यानं माझा कागदहि हिसकावून घेतला. त्याच्या ह्या वागणुकीचा मला राग आला. त्यांतच मला शंका आली, सूर्यपोटीं जसा शनीश्वर, तसा माझ्यासारख्या पाक काँग्रेसवाल्याच्या पोटीं हा बंड्या म्हणजे कुणी हिंदुत्वनिष्ठ तर जन्माला आलेला नाहीं ना? आणि म्हणून तर तो माझ्या उर्दू शिक्षणांत व्यत्यय आणीत नाहीं ना ? आणि अशी शंका माझ्या मनांत येतांच माझा राग द्विगुणित झाला. माझी सारी अहिंसा विसरून जाऊन मी आतां बंड्याच्या पाठीत एक धपाटा देणार, इतक्यांत शेखसाहेब मध्यें पडून म्हणाले, "जाने देव. वच्चा है वो !" मग ते अस्सल पुणेरी मराठींत बंड्याला म्हणाले,

"बाळ, तुलाहि शिकायचं आहे का?"

"होय, मला थिकायचं!" माझ्याकडे तुच्छतेनं पाहत बंड्या म्हणाला.

"छान, छान; शिकवीन हं तुलाहि." मग ते मला म्हणाले, "ये देखो गोविंदराव, ये तुम्हारी अवलादभी काँग्रेसवालाहि होयगी."

त्यांचं हें बोलणं ऐकून मला आनंद वाटला, पण थोडं आश्चर्यहि वाटलं. माझ्या अगदीं उलट निष्कर्ष शेखसाहेबांनीं कशावरून काढला, हें जाणण्याची मला उत्सुकता वाटू लागली. माझ्या मतें बंड्या हिंदुत्व-निष्ठ होता—माझ्या कुळाला काळिमा लावणारा होता. म्हणून मी विचारलं, "वो कैसा?"

"ये देखोना, इतनी छोटी उमरमें वो उर्दू पढना चाहता है." शेखसाहेब कौतुकाच्या स्वरांत म्हणाले.

"हाँ. बराबर. उसकी तरक्की मेरे जैसी..." मी बोलूं लागलों.

"ये तरक्की क्या?" शेखसाहेब मध्येंच म्हणाले.

"तरक्की याने तरक्की!" मी म्हणालों. "वो उर्दू शब्द है. आपको उसका अर्थ मालूमहि होगा."

"वा, वा साहब. उर्दूमें तरक्की ऐसा शब्दहि नहि है!"

"शुक्रिया!" मी म्हणालों, आणि शेखसाहेबांच्या विधानाबद्दल आश्चर्य करूं लागलों. 'तरक्की' ह्या शब्दाचा अर्थ मलाहि ठाऊक नव्हता. पण त्या शब्दाचा तोंडवळा उर्दू होता खास. शेखसाहेबांचं उर्दूचं हें अज्ञान पाहून माझा त्यांच्याविषयींचा आदर थोडा कमी झाला.

बंड्याचा हा त्रास चुकवण्याकरतां मग शेखसाहेबांनी आम्हां पिता-पुत्रांत तडजोड घडवून आणली. माझा कागद आणि पेन्सिल त्यांनीं बंड्याला बहाल केली, आणि मी दुसरा कागद आणि पेन्सिल आणावी असा त्यांनीं निकाल दिला. मग हा आमचा रोजचाच कार्यक्रम सुरू झाला. मी उर्दूचे धडे शिकत असतांना माझ्या शेजारीं बसून बंड्याहि कागदावर कांहींतरी रेघोट्या ओढीत बसे. माझी नक्कल करून तो मधून मधून आपल्या रेघोट्या शेखसाहेबांना दाखवीत असे, आणि त्याची समजूत घालण्याकरतां शेखसाहेबहि त्याला कौतुकानं शाबासकी देत असत. ही व्यवस्था केल्यापासून माझा अभ्यास पुष्कळच सुरळीत चालू झाला. रेघोट्या ओढण्याचा कंटाळा आला म्हणजे बंड्या मधून मधून दांडगाई करी, नाहीं असं नाहीं. पण ती कुठं माझ्या पाठीवरच उडी मार, किंवा शेखसाहेबांची दाढीच ओढ, अशापैकीं क्षुल्लक असे. लवकरच माझी उर्दूमध्यें चांगल्यापैकीं प्रगति होऊं लागली.

रोज न चुकतां शेखसाहेब मला उर्दू शिकवण्याकरतां येत. पगार देऊनहि इतका नियमितपणा कुणी पाळला नसता. मधूनमधून ते माझी परीक्षा घेत आणि मग निराशायुक्त स्वरांत म्हणत, "इतनेमें कुरान नहि पढ सकेंगे!"

रोज ते मला थोडा गृहपाठ देऊन जात व दुसऱ्या दिवशीं ते आले कीं माझा गृहपाठ मी त्यांना प्रथम दाखवीत असें. साधारण महिना दीड महिना आमचा हा कार्यक्रम अगदीं सुरळीत चालला, आणि मग सारंच ऑफस् झालं.

त्या दिवशीं माझ्या घड्याळांत अकरा वाजून गेले तरी शेखसाहेबांचे दहा वाजले नव्हते. म्हणून ते येण्यापूर्वी आंघोळ तरी उरकून घ्यावी म्हणून मी आंघोळीला गेलों. माझी आंघोळ होऊन मी कपडे घालीत असतांनाच शेखसाहेब आले.

" आयीये शेखसाब ! बैठीये !" मी त्यांचं स्वागत केलं.

" हाँ, हाँ, चलना देव. कुछ गर्दी नही." शेखसाहेब खुर्चीवर बसतां बसतां म्हणाले. मग त्यांनीं पृच्छा केली, " होमवरक् तय्यार है ? "

" हाँ, हाँ." मी म्हणालों.

" देखना चाहता हूं, जबतक तुम् कपडा पेनते है ! " ते म्हणाले.

" ज्यरूर ज्यरूर. " मी म्हणालों. " वो टेबलपरहि है हमारा होमवरक्. आप देख सकते है. "

" लेता हूं मैं. आपना चलना देव आस्ते आस्ते. "

" शुक्रिया."

शेखसाहेबांनीं टेबलावरचा कागद घेतला, आणि खुर्चीत व्यवस्थित बसून ते माझं ' होमवरक् ' तपासूं लागले.

" कितना गिचमिड लिखा है !" कागद पाहतांच त्यांनीं शेरा मारला, " जरा अच्छी तऱ्हासे लिखते जाना भाई !"

त्यांचा हा शेरा ऐकून मला जरा आश्चर्यच वाटलं. कारण आजचा गृहपाठ लिहितांना अक्षर सुबक काढण्याची तर मी विशेषच काळजी घेतली होती. ह्याहिपेक्षां सुंदर अक्षर काढण्याची ईर्षा माझ्या मनांत

उत्पन्न व्हावी म्हणून शेखसाहेबांनीं तसा शेरा मारला असावा, असं मग मी मनाचं समाधान केलं.

शेखसाहेब माझं 'होमवरक्' पुन्हां तपासूं लागले. माझं 'होमवरक्' पाहून, दाढीमिशांतून त्यांचा चेहऱ्याचा जेवढा भाग दिसणं शक्य होतं, त्या भागावर काय फरक पडतो, हें मी उत्सुकतेनं पाहूं लागलों, आणि त्यांच्या चेहऱ्यावर जो फरक पडलेला मी पाहिला, तो पाहून मी आश्चर्यचकित तर झालोंच, पण मला थोडी भीतीहि वाटली.

शेखसाहेबांनीं तो कागद वाचला मात्र, त्यांच्या चेहऱ्यावर एकदम ट्रॅन्स्फर सीन झाला. त्यांच्या चेहऱ्याचं इतक्या वेळचं एखाद्या शांत उद्यानाचं स्वरूप नष्ट झालं, आणि त्याची जागा झंझावातानं झिंगणाऱ्या जंगलानं घेतली. एरव्हीं त्या उद्यानांतल्या शांत पुष्करणीप्रमाणें शोभणारे त्यांचे डोळे, भडकलेल्या वणव्याप्रमाणें दिसूं लागले. ते उद्गारले,

"पाजी हरामखोर!"

"कौन?" मी विचारण्याचा हिय्या केला.

"कौन? तुम्!" शेखसाहेब खेंकसले.

"शुक्...रिया!"

"शुक्रिया गया तुमारा जहान्नम्में. बेईमान्–बेवकूफ्—हं! हम् बेवकूफ्!—तुम् कॉंग्रेसवाले सबहि ऐसे लुच्चे रहयते है. बेवकूफ्!" मग ते मोठ्यानं ओरडले, "बेबकूफ्!" मग ते आणखी मोठ्यानं ओरडले, "बेवकूफ्! मै बेवकूफ्!!" आणि मग मा ते एखाद्या उर्दू नाटकांतल्या खलनायकानं डरकाळया फोडीत विंगमध्यें जावं, तसे घरांतून बाहेर पडले.

ते तसे बाहेर पडलेले पाहून मला धीर आला. त्यांनीं एकदम असं रागवण्यासारखं काय झालं, हें मला कळेना. त्यांचा तो राग पाहून

एखाद्या हिंदुत्वनिष्ठाला ब्रह्महत्येच्या पातकाबद्दल जितकं वाईट वाटेल, तितकं मला वाईट वाटलं. आणि त्याच दुःखाच्या भरांत जड पावलं टाकीत मी टेबलाकडे गेलों.

टेबलावरचा माझ्या गृहपाठाचा कागद मीं उचलून पाहिला. मला तो अनोळखी वाटला. मला एक शंका आली. आमचे चिरंजीव शेख-साहेबांचा आरडाओरडा ऐकून बाहेर आले होते. त्यांना मी प्रश्न केला, " हें कुणी लिहिलंय् ? "

" मीत थिइलंय् " बंडोपंत अभिमानानं म्हणाले, " माधं होमवल्क आहे तें ! "

आपल्या पुरातन काळच्या पूर्वजांचं अनुकरण करून बंडोपंतांनीं माझी नक्कल करून ठेवली होती. तो कागद मी वरवर पाहिला. त्यांतून मला कांहींच अर्थबोध होईना. शेखसाहेब त्या कागदाकडे पाहून एकदम एवढे कां संतापले असावेत, मला कांहीच कळेना. पण असा विचार करीत मी त्या कागदाकडे पाहत आहें, तों त्या कागदा-वरच्या रेघोट्यांत लपलेलीं कांहीं उर्दू अक्षरं स्पष्ट होऊं लागलीं. मी नीट लक्ष देऊन पाहिलं, आणि हळूहळू मला त्यांचा अर्थ लागू लागला. थोड्याच वेळांत त्या कागदावर मला स्पष्ट पण जरा गिचमिड उर्दूत लिहिलेलं दिसून आलं,

" शेखसाब, तुम बेवकूफ है. "

---

# १०. चाणाक्ष वाचकांकरतां गोष्ट

जे वाचक चाणाक्ष नसतील, त्यांनीं ही गोष्ट वाचण्याच्या भानगडींत पडूं नये. कारण, ह्या गोष्टीचा विषय सेन्सॉरच्या प्रांतांतील असल्यामुळें त्याविषयीं स्पष्टपणानं लिहितां येणें शक्य नाहीं. सध्यां वर्तमानपत्रांतून ह्या विषयासंबंधींच्या बातम्या देतांना जी परिभाषा उपयोगांत आणली जाते, तिलाच अनुसरून मला ह्या गोष्टीचा पुष्कळसा भाग लिहावा लागणार आहे. अर्थात्, सेन्सॉरच्या काकदृष्टीला तर आक्षेपार्ह कांहीं दिसणार नाहीं आणि वाचकांना मात्र शक्य तेवढ्या स्पष्ट रीतीनं सांगतां येईल, अशा शैलीनंच लिहिण्याची मी कोशीस करीन.

ह्या गोष्टीचे दोन भाग पाडतां येतील. एक सामाजिक व दुसरा वैयक्तिक. हा वैयक्तिक भाग माझा मित्र आबल्या ह्याच्याशीं निगडित आहे; आणि दुसरा जो सामाजिक भाग तो आबल्याच्या ह्या वैयक्तिक जीवनाशीं मिसळून गेलेला आहे.

महात्मा गांधींची शेळी जर एखादे दिवशीं हरवली, तर तिच्या जागीं आबल्याला बांधायला हरकत नाहीं, इतका आमचा आबल्या गरीब आहे. शाळेंत असल्यापासून पाहतोंय मी त्याला,—कधीं त्यानं तोंडावरची माशी उडवली नाहीं. इतर मुलं त्याच्या खोड्या काढीत, त्याच्याशीं भांडत,—पण तो कधीं कुणाशीं भांडला नाहीं. कुणीहि त्याच्यावर वरचष्मा गाजवावा, त्याला हुकूम सोडावेत, आणि त्याच्याकडून आपलीं कामं करवून घ्यावीत. जणूं तो गुलामाचं जीवन जगण्याकरितांच जन्माला आला होता.

अर्थातच, त्याचं लग्न झालं तेव्हां, ह्या विचित्र जगरहाटीला अनुसरून, त्याच्या अंगांतील गुणांच्या सर्वस्वीं विरुद्ध अशा गुणांची धर्मपत्नी त्याला मिळाली. आबल्या गुलाम होण्याकरतांच जन्माला आला होता, तर असल्या गुलामांवर हुकुमशाही गाजवण्याकरतांच दुर्गा जन्मली होती. परमेश्वरानं दोघांना रूपंहि अशीं देऊन ठेवलीं होतीं कीं त्या जोडप्याकडे पाहतांच, त्या दोघांतला गुलाम कोण आणि हुकुमशहा कोण, हें पाहणाराला क्षणार्धांत कळून यावं. प्रथम त्याला आबल्याची कींव वाटली, तरी थोडया विचारानंतर दुर्गासारखी रक्षण-कर्ती त्याला मिळाली, ह्या योगायोगाचं एका बाजूनं त्याला समा-धानहि वाटे.

दुर्गा त्याला अगदीं शाळेंतल्या मुलाप्रमाणें शिस्तींत वागवी. त्याच्या दैनंदिन जीवनक्रमाची तिनं आंखणी करून दिली होती, आणि तिच्या देखरेखीखालीं आणि पहाऱ्याखालीं बिचारा आबल्या आपला ठराविक चाकोरींतला मार्ग वर्षानुवर्ष आक्रमीत होता.

आमच्या गांवीं जो सामाजिक शांतताभंग झाला त्याची वैयक्तिक पार्श्वभूमि ही अशी होती.

ज्या गांवांत हा शांतताभंग घडून आला, तो आमचा गांव मुंबई इलाख्याच्या पूर्व-सरहद्दीवर मध्यापासून किंचित् उत्तरेस आहे. मुंबई-हून वाफेवर चालणारं जें एक अवजड वाहन आग्नेय दिशेनं जातं, त्याला ह्या गांवीं पोहोंचण्यास तीन ते चार ह्यांच्या दरम्यान तास लागतात. हिंदुस्थानांतल्या सर्वच गांवांतल्याप्रमाणें आमच्या गांवांतहि एक जमात बहुसंख्य आहे, व दुसरी एक जमात अल्पसंख्य आहे. आमचा गांव राजकीय दृष्टया जागृत आहे. तसाच तो मुंबईपासून एक शतक आणि कांहीं मैल येवढाच दूर असल्यामुळें, मुंबईतील साऱ्या फॅशन्स

आमच्या गांवींहि फारच लवकर येऊन पोहोंचतात. सध्यां मुंबईतील एका जमातीच्या माणसानं दुसऱ्या जमातीच्या माणसाच्या पोटांत एक तीक्ष्ण शस्त्र खुपसण्याची फॅशन निघाली आहे, असं आम्हांला कळलं होतं, आणि आमच्या गांवींहि ही फॅशन केव्हां सुरू होते, ह्याविषयीं सर्व नागरिकांना जिज्ञासा वाटत होती. जे इतके दिवस 'मवाली', 'गुंड' ह्या नांवांनीं हिणविले जात होते अशा नागरिकांकडे लोक आतां आपले संरक्षणकर्ते ह्या भावनेनं मोठ्या आदरानं नि आशेनं पाहूं लागले होते, व कधीकधीं त्यांना स्वतःच्या खर्चानं चहा, पानपट्टी आणि एक 'पिला हत्ती' हि देऊं लागले होते. इतके दिवस एकमेकांना मित्र समजणारे दोन्ही जमातींतील लोक, एकमेकांकडे संशयानं पाहूं लागले होते, व कोणी असा दुसऱ्या जमातींतील माणूस सहज रस्त्यानं भेटला तर त्याच्याशीं वरपांगीं मित्रत्वानं वागत असतांना, त्याच्या बगलेंत एखादं तीक्ष्ण शस्त्र तर लपविलेलं नाहीं ना, हें बारीक दृष्टीनं पाहून घेत होते. प्रत्येक जमातींत दुसऱ्या जमातीनं तीक्ष्ण शस्त्रास्त्रांचीं पार्सलं मागविल्याच्या बातम्या उठल्या होत्या. दारूगोळ्याचं कोठार भरून तयार होतं. फक्त आतां ठिणगी केव्हां व कशी पडते, एवढंच पहायचं राहिलं होतं.

आणि अखेरीस हा अपेक्षित भडका, अत्यंत अनपेक्षित रीत्या उडालाच. हा भडका उडण्याचं कारण नेहमींच्या ठराविक सरकार-मान्य कारणांपैकीं नव्हतं. एका जमातीला पूज्य वाटणाऱ्या एखाद्या दुभत्या स्त्रीलिंगी चतुष्पादाच्या डोक्याची, दुसऱ्या जमातीच्या एखाद्या घटकानं, भररस्त्यावर, शरिरापासून ताटातूट केलेली नव्हती; एका जमातीच्या प्रार्थनामंदिरासमोर दुसऱ्या जमातींतल्या माणसानं, फुंक मारली असतां किंवा जोरानं ठोके बडविले असतां, कर्कश आवाज काढणाऱ्या वस्तूचा उपयोगहि केलेला नव्हता; एखाद्याच्या डोक्यावर

असलेल्या पवित्र केसांच्या झुपक्याची त्याच्या डोक्यापासून दुसऱ्या जमातींतल्या एखाद्या दुष्टानं फारकतहि केलेली नव्हती; दुसऱ्या जमातींतील एखाद्या व्यक्तीच्या हनुवटीखालील केसांच्या झुपक्याचा दुसऱ्या जमातींतील कुणा घटकानं अपमानहि केला नव्हता; किंवा एका जमातीला पवित्र वाटणाऱ्या प्रार्थनामंदिरांत त्या जमातीला निषिद्ध वाटणाऱ्या एका गलिच्छ पशूच्या शरिरांतील भागहि कोणी फेंकला नव्हता. आणि तरीदेखील हा भडका उडाला होता!

आमच्या गांवीं हा जो शांतताभंगाचा स्फोट झाला होता, त्याला कारणीभूत आमचा आबल्या होता, असं सांगितलं तर तुम्हांला आश्चर्य वाटेल. आम्हांलाहि तें तसं प्रथम वाटलं. बिचारा! घरीं तर त्याला दुर्गाकडून कधींकधीं मार खावा लागेच, पण ह्यावेळीं तर त्याला घराबाहेरहि मार खावा लागला होता!

ज्या दिवशीं हा शांतताभंग आमच्या गांवी झाला, त्या दिवशीं सकाळपासून गांवांत वायूच्या वेगानं एकच बातमी पसरली होती. कुणा एका माणसाला दुसऱ्या जमातींतील माणसांनीं कांहीं एक कारण नसतां बेदम पिटून काढला, अशी ती बातमी होती. अधिक चौकशीअंतीं हा मार खाल्लेला माणूस दुसरातिसरा कोणी नसून मार खाण्याकरतांच जन्माला आलेला आबल्या होता, हें आम्हांला कळून आलं.

आदल्या दिवशीं सायंकाळीं आपल्या पलंगावर बसल्याबसल्या दुर्गा आबल्याला म्हणाली होती, "काय करतांय्?"

"जी सरकार, कांहीं नाहीं!" गडबडीनं धांवत येऊन आणि तिच्या समोर हात न जोडतां पण हात जोडल्याचा आभास उत्पन्न करणाऱ्या मुद्रेनं उभा राहून आबल्या म्हणाला होता.

"आतां अक्कल कधीं येणार तुम्हांला? संसारांत कांहीं लक्ष घाला!" दुर्गा कडाडली होती.

" जी सरकार, कसूर माफ असावी ! "

" आतां पावसाळा येणार—"

" माळ्यावरून छत्र्या काढून ठेवल्या आहेत, सरकार—"

" छत्र्यांविषयीं नाहीं मी म्हणत. पाहयल्या त्या छत्र्या मी. मी कांहीं आंधळी नाहीं ! "

" जी सरकार ! "

" कोळशाचीं चार पोतीं आणून ठेवलीं पाहिजेत. नाहींतर मग ओला कोळसा आणावा लागेल."

" जी सरकार—"

" मीच गेलें असतें. पण मला जरा बरं नाहीं—"

" औषध आणूं का ? "

" वात्रटपणा करूं नका. औषध आणायला मी कांहीं मरायला नाहीं पडलें.— हं, हे पंचवीस रुपये घ्या, नि आत्तांच्या आत्तां जाऊन कोळशाचीं चार पोतीं घेऊन या. "

" जी सरकार. "

" आणि भुगा नका आणूं कोळशांत."

" जी सरकार. "

" फार मोठेहि नकोत कोळसे. फोडतां फोडतां हात दुखून येतात माझे. "

" जी सरकार. "

" अर्धवट जळकेहि नकोत. धूर फार होतो. "

" जी सरकार. "

" नीट उभे राहून निवडून घ्या आणि समक्ष पोतीं भरून घ्या. "

" जी सरकार. "

" आज रात्रीच्या आंत कोळशाचीं पोतीं घरांत येऊन पडलीं पाहिजेत ! "

"जसा आपला हुकूम."

नंतर कोटटोपी घालून, आणि ते पंचवीस रुपये आंतल्या खिशांत ठेवून, आबल्या बाहेर पडला होता. नंतर पुढील प्रकार घडला, अशी सर्व गांवभर वदंता होती—

दुसऱ्या जमातीच्या मोहल्यांत असलेल्या व दुसऱ्या जमातींतील एक इसम मालक असलेल्या एका कोळशाच्या वखारींत आबल्या गेला, आणि तिथं जातांच त्याच्यावर एक भयंकर प्रसंग गुदरला.

तिथल्या नोकरानं आबल्याला कोळसे देण्याकरतां म्हणून वखारींत नेलं. आंत, आंत, खूप आंत नेलं. तिथं आतां त्या दोघांखेरीज कोणीच नव्हतं. एखाद्या अंधाऱ्या, भयाण गुहेंत असल्यासारखं आबल्याला वाटलं. आतां त्या गुहेच्या कोठल्या कोंपऱ्यांतून एखादा हिंस्र पशू आपणांवर झडप घालतो, हें तो केविलवाण्या नजरेनं पाहत होता. नको तो कोळसा. पावसाळ्यांत आपण उपाशी राहूं, किंवा ओल्या कोळशाच्या धुरानं डोळे फोडून घेऊं—तें परवडलं, पण त्या भयाण गुहेंतून ताबडतोब सूंबाल्या करावं, असा तो विचार करीत होता; तोंच हातांत दोरखंड आणि बांबूचे लांब तुकडे घेऊन चार आडदांड असामी, आरबी भाषेंतील सुरस आणि चमत्कारिक गोष्टींतल्याप्रमाणें, एकाएकीं—कुठून आणि कसे, कोण जाणे!—त्याच्यासमोर उभे ठाकले. सुदैवानं त्यांनीं आपल्या तोंडावरून रुमाल बांधलेले असल्यामुळें, त्यांच्या क्रूर चेहऱ्यांकडे पाहून आबल्याची जी गाळण उडाली असती, ती उडाली नाहीं. त्यांचे आडदांड देह पाहून तो घाबरला होता हें खरं, पण तो मटकन् खालीं बसला नव्हता. त्या लोकांनीं तोंडावरून रुमाल बांधलेले असल्यामुळें ते लोक कोण होते आणि कुठल्या जमातीचे घटक होते, हें ओळखणं मात्र जरा मुष्किल झालं होतं. तरी पण ज्याला थोडी तरी तर्कशक्ति आहे, त्याला तो मोहल्ला, त्या वखारीच्या

मालकाची जमात, वगैरे गोष्टींवरूनच ते मारेकरी कुठल्या जमातीचे असावेत, हें ओळखून काढणं कांहीं विशेषसं अवघड नव्हतं. त्यांतून त्यांनीं आबल्यासारख्या निरुपद्रवी इसमावर, त्यानं कांहींहि आगळिक केलेली नसतां हल्ला करावा, हाहि एक सबळ पुरावा होता.

त्यानंतर जो प्रकार घडला, तो आबल्याच्याच अप्रतिम वर्णनशैलीनं सांगितलेला बरा.

"ते उंच, धिप्पाड शत्रू पाहून माझे बाहु स्फुरण पावूं लागले. माझ्या मुठी वळूं लागल्या. एकेकावर झडप घालून, प्रत्येकाला पाळीपाळीनं जमिनीवर लोळवावा, असा मी विचार करीत होतों.—कां ? हंसतां कां ? माझा हाडकुळा देह पाहून तुम्हांला ह्या थापा वाटतात होय ? —पण शौर्य माणसाच्या शरिराच्या आकारावर नसतं, तें माणसाच्या मनावर अवलंबून असतं, —आतां मी त्यांच्यावर झडप घालून निदान दोघांना तरी लोळवणार, इतक्यांत मला माझ्या असहाय्यतेची जाणीव झाली. त्या लोकांनीं मला कोंडींत पकडून माझ्यावर पद्धतशीर हल्ला कसा करायचा ह्याचे बेत आधींपासूनच मुक्रर करून ठेवलेले असावेत. त्यांचा सेनापति युद्धनीतींत मोठा कुशल असला पाहिजे. मी कांहींहि हालचाल करण्यापूर्वींच त्या चौघांनीं मला चारी बाजूंनीं वेढलं होतं. आतां अधिक विचार करीत बसण्यांत फायदा नव्हता. वेड्याच्या शौर्यानं त्यांच्याशीं मुकाबला करणं भाग होतं. जो आडदांड इसम—माझ्या चौपट तरी असेल तो—माझ्यासमोर माझ्यावर हल्ला करण्याच्या तयारीनं उभा होता, त्याच्यावर मी तुटून पडलों, आणि रुमालानं झांकलेल्या त्याच्या गालावर मी एक जबरदस्त ठोसा लगावला. माझा तो ठोसा येवढा पोलादी होता कीं, खरं पाहतां, त्यामुळं त्या माणसानं जमिनीवर लोळणच घ्यायला पाहिजे होती. पण ठोसा मारूनहि तो जसाच्या तसा ताठ उभा होता. जणूं मीं त्याचा गालच

चुचकारला होता! असं का व्हावं ह्याचं कारण, माझी मूठ आणि त्याचा गाल ह्यांचा संघर्ष झाला तेव्हांच मला कळून आलं होतं. त्याच्या गालांवर कसलं तरी दाट आणि मऊमऊ असं आवरण होतं; आणि एखाद्या गादीप्रमाणें त्या आवरणानं माझ्या ठोशांतली सारी शक्ति शोषून घेतली होती!"

ते मारेकरी कुठल्या जमातीचे होते हें ठरविण्याकरतां ह्या मुद्याचाहि उपयोग होण्यासारखा होता.

नंतर त्या मारेकऱ्यांनीं आबल्यावर चारी बाजूंनीं हल्ला केला होता. त्यांनीं त्याचे हातपाय बांधले होते, आणि त्याला बेदम मुका मार दिला होता. नंतर त्यांनीं दुर्गानं आबल्याला कोळसे आणण्याकरतां दिलेले पंचवीस रुपयेहि लांबवले होते.

सारी रात्र आबल्या बांधलेल्या स्थितींत त्या वखारीच्या गुहेंत पडून होता. पहांटेच्या सुमाराला मोठ्या खटपटीनं त्यानं तें दोरखंड सोडविलें होतें, आणि सकाळ झाल्यावर कोळसे घरीं घेऊन येण्याऐवजीं आबल्या काळं तोंड घेऊन घरीं आला होता.

आबल्या अजून कसा घरीं येत नाही म्हणून दुर्गानं ती सारी रात्र काळजींत आणि त्याला शिव्या देण्यांत घालवली होती. तो परत आला कीं त्याला काय शिक्षा करावी, ह्याचेहि बेत ती मनांतल्या मनांत ठरवीत होती. तोंच उजाडलं, आणि दुःखी अपमानित चेहऱ्यानं आबल्या परत आला.

तो समोर दिसतांच दुर्गानं प्रथम त्याच्यावर एक फैर झाडली. मग ती थोडीशी थांबतांच आबल्यानं आपल्यावर गुदरलेल्या भयंकर प्रसंगाची तिला कल्पना आणून दिली.

ती हकीकत ऐकतांच दुर्गाचं कोमल स्त्रीहृदय कळवळलं. आपले केस सोडून आणि छाती बडवून घेत ती बाहेर रस्त्यावर आली.

आणि मोठमोठ्यानं रडूं लागली. हां हां म्हणतां लोकांची गर्दी जमली आणि मग त्या जमावासमोर दुर्गानं आवेशानं भरलेल्या वक्तृत्वपूर्ण भाषेंत भाषण केलं,—

" ...तुम्ही भित्र्या भागूबाई आहांत. माझ्या नवऱ्याला दुसऱ्या जमातीच्या लोकांनीं बेदम मारलं!—त्याचा खूनच पडायचा, पण माझ्या मंगळसूत्राची दोरी बळकट म्हणूनच ते बचावले...अग आई ग ऽऽ"—असं म्हणून तिनं आपली पाठ चोळली, आणि जणूं दुसऱ्या जमातीच्या लोकांनीं तिलाच मार दिला आहे, असा त्या जमावांत आभास निर्माण झाला. जमावांत त्या दृश्यानं चेव निर्माण होऊं लागला. दुर्गा पुढं बोलूं लागली, " तुम्ही षंढ आहांत. दुसऱ्या जमातीचे लोक तुमच्यावर अत्याचार करतात. आणि तुम्ही मात्र हातांत बांगड्या भरून तें उघड्या डोळ्यांनीं पाहतां! कुठं गेलं तें तुमच्या पूर्वजांचं शौर्य? ते शिवाजीमहाराज, तानाजी मालुसरे, बाजी प्रभू...काय? अजूनहि तुम्हांला चीड येत नाहीं? मग घ्या तर माझ्या ह्या बांगड्या नि भरा आपल्या हातांत!–"

असं म्हणून तिनं आपल्या हातांतल्या सोन्याच्या बांगड्या मागं सारल्या, आणि कांचेच्या बांगड्या ती काढूं लागली. पण तिच्या त्या बांगड्या घेण्यास तिथं कोणीच उरलं नव्हतं. तिच्या भाषणाचा अपेक्षित परिणाम झाला होता, आणि सारेजण शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन दुसऱ्या जमातीच्या मोहल्ल्याच्या दिशेनें निघाले होते.

गांवांतलीं दुकानं पटापट बंद झालीं. शांतताप्रिय नागरिकांनी आपल्या घरांच्या खिडक्या—दरवाजे बंद करून कडेकोट बंदोबस्त केला. दोन्ही जमातींच्या मोहल्ल्यांच्या सरहद्दींवर दोन्ही जमातींतल्या लढाऊ जमावांची गांठ पडली.

दोन्ही जमावांतील वीर, एकमेकांपासून दगडफेकीच्या टप्प्याबाहेर,

इतक्या अंतरावर एकमेकांना आव्हान देत उभे होते. ज्याला जे शस्त्र सांपडलं तें–लाठी, सुरे, ॲसिड, मिरचीची पूड–घेऊन प्रत्येक लढय्या सज्ज होता. आतां फक्त सशस्त्र पोलिसांची तुकडी येण्याचीच सारेजण वाट पाहत होते. ते आले कीं दोन्ही जमाव एकमेकांशीं भिडले असते.

थोड्याच वेळांत सशस्त्र पोलीस आले, आणि त्यांनीं सामोपचारानं जमावांची पांगापांग केली. रात्रीपासून कर्फ्यू ऑर्डर काढण्यांत आली.

आबल्या जिवंत हुतात्मा झाला!

आबल्यावर हा भयंकर प्रसंग गुदरला खरा; पण वाइटांतून चांगलं निघतं म्हणतात, त्याप्रमाणें दुर्गा त्या दिवसापासून त्याच्यावर अफाट प्रेम करूं लागली. इतकं कीं, दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती आबल्याला घेऊन औषधोपचाराकरतां माझ्या दवाखान्यांत आली.

सध्यां आमच्या गांवांत सर्वांत लोकप्रिय असलेली ती व्यक्ति मी डोळे भरून पाहून घेतली. त्याच्या तोंडून मला सारी हकीगत ऐकून घ्यायची होती, म्हणून मी त्याला जरा बसावयास सांगितलं. तेव्हां तो दुर्गाला म्हणाला,

"ऐकलं का डॉक्टर काय म्हणताहेत तें?"

"काय?"

"मला बसायला सांगताहेत ते."

"कांही नाहीं बसायचं इथं. घरचीं कामं..." दुर्गा कडाडू लागली. पण तेवढ्यांत आबल्यानं आपला दंड दाबून धरला आणि तोंडांतून 'आई ग ऽ ऽ!' असा दुःखार्त उद्गार काढला. त्याबरोबर दुर्गा पुढं बोलूं लागली, "बरं बसा. डॉक्टर, यांना नीट तपासून औषध द्या. दुष्ट मेले! (अर्थात्‌च हें विशेषण त्या मारेकऱ्यांना उद्देशून असावं!) माझं कपाळच फुटलं असतं...मी जातें. मला कामं आहेत.—आणि

येतांना नीट संभाळून या हं ! नाहींतर टांग्यानच या. हे घ्या आठ आणे टांग्याकरतां..."

आबल्याच्या सुरक्षिततेकरतां जरूर त्या सूचना परत परत देऊन मग ती प्रेमाची मूर्ति निघून गेली. ती दिसेनाशी होतांच, तिनं टांग्याकरतां दिलेल्या पैशांतून आबल्यानं एक सिगरेटचं पाकीट आणवलं, आणि मोठ्या समाधानानं त्यानं एक सिगरेट शिलगावून धुराचे भपकारे सोडण्यास सुरुवात केली.

माझं बाकीचं काम संपल्यावर मी आबल्याला त्याच्यावरचा तो दुर्धर प्रसंग वर्णन करून सांगण्याची विनति केली. त्यानंहि आपला अनुभव चांगला तिखट-मीठ लावून तळून सांगितला.

त्यानंतर मी आबल्याला आंतील खोलींत घेऊन गेलों, आणि त्याच्या शरिरांतील हाड न् हाड नि अवयव न् अवयव तपासला. नंतर मी त्याला बाहेर घेऊन आलों, आणि थोडा वेळ विचार करून मी त्याला म्हणालों,—

"आबल्या, आतां खरं सांग. ही बनवाबनवी माझ्यापुढं चालायची नाहीं !"

"अँ ?"

"तुला कुणी मारल नाहीं कीं लुबाडलं नाहीं. तुला कांहींच दुखापत झालेली नाहीं. तू येवढी आरडाओरड करत असलास तरी तुला मुका मारहि बसलेला नाहीं. ह्या साऱ्या तुझ्या थापा आहेत !"

"वा: डॉक्टर ! ..."

"ऐक. कुणाला तुला लुटायचं असलं तर वखारीच्या आंत नेऊन, हातपाय बांधून लुटायची रे काय जरूर ? एक थप्पड लगावल्यानंहि तें काम होण्यासारखं आहे. आणि त्याकरितां चार आडदांड मारेकरी

रे कशाला ? एक पाव मारेकरीसुद्धां पुरला असता ! आणि तूं काय त्यांना ठोसा लगावणार ? बायकोला भिणारा तूं !"

आबल्या गप्प बसून राहिला.

"खरं काय तें सांग बघूं आतां मला सारं." मी जरा करड्या आवाजांत म्हणालों.

"सांगतों." खिन्न चेहरा करून आबल्या म्हणाला, "पण कृपा करून दुर्गाला मात्र ह्यांतलं एक अक्षरहि कळणार नाहीं एवढी काळजी घ्या."

"तिला ह्यांतलं एक अक्षरहि सांगणार नाही."

"मग सांगतों तर."

त्यानं एक सिगरेट शिलगावली व तो सांगूं लागला.

"त्या दिवशीं आमच्या सौभाग्यवतीनं कोळसे आणण्याचा हुकूम देऊन माझ्याकडे पंचवीस रुपये दिले होते, हें खरं आहे. ते पैसे खिशांत घालून मी बाहेर पडलों, आणि कधीं नव्हते असे विचार माझ्या मनांत येऊं लागले.

"कदाचित् त्या पंचवीस रुपयांच्या जोरावर असेल, पण माझं मन बंड करून उठलं. ह्या जगांतलं कुठलंहि काम मी पार पाडूं शकेन, इतका मला हुरूप वाटत होता. दुर्गा माझ्यावर जी हुकुमशाही गाजवत होती, अगदीं क्षुल्लक गोष्टीचंदेखील तिनं मला जें स्वातंत्र्य ठेवलेलं नव्हतं, त्याविरुद्ध माझ्या मनानं उचल घेतली. तिच्या करड्या देखरेखीखालीं मला साधींसुधीं सुखंदेखील कधीं उपभोगायला मिळालीं नव्हतीं. लग्नापूर्वीं इतक्या सिगरेटी ओढणारा मी—पण अलिकडे दिवसांतून कुठं एखादी सिगरेट चोरून मारून ओढायला मिळाली तर नशीब, असं म्हणण्याची पाळी आली होती. त्या दिवशीं संध्याकाळीं ते पंचवीस रुपये खिशांत घालून मी रस्त्यानं चालूं लागलों, तेव्हां माझं मन म्हणालं, बस्स, तें कांहीं नाहीं ! आज मजा मारायचीच, जें

जें सुख उपभोगतां येण्यासारखं असेल, त्याचा अनुभव आज घेऊन टाकायचा. पंचवीस रुपये आज नुसते उडवायचे! —

" मी असं ठरवलं आणि एक पानपट्टी आणि सिगरेट विकत घेण्याकरतां एका पानपट्टीवाल्याच्या दुकानाशीं गेलों. मी खिशांत हात घातला, पण त्या पंचवीस रुपयांना हात लावण्याचा कांही मला धीर झाला नाहीं–माझ्या कच्च्या मनाला शिव्याशाप देत मी पुढला रस्ता चालू लागलों !

" तेवढ्यांत मला रंगराव भेटला. एखादी संध्याकाळ अशी चैनींत घालवायची असली, तर रंगरावसारखा दुसरा जोडीदार मिळायचा नाहीं. जणूं दुर्गाचा पराभव करण्याकरतां देवानंच त्याला मला कुमक म्हणून पाठवलं होतं ! माझ्या बंडांत मला त्याचं नैतिक पाठबळ मिळालं आणि मग आम्ही जगाचे, दुर्गाचे, नीतीचे—सारे धरबंध झुगारून देऊन प्रथम जमशेटजीच्या दुकानांत गेलों.

" कित्येक वर्षांनीं प्यावयास मिळणारं तें मद्य मी आकंठ प्यालों. आणि मगच मी शुद्धीवर आलों.—मी बंड करतांना करून गेलों होतो खरा, पण आतां घरीं कसं जायचं ह्याविषयी मी कांहींच विचार केला नव्हता. कोळशाचीं पोतीं बरोबर न नेतां घरीं जायचं, पैशाचा हिशोब द्यायचा, आणि त्याकरतां कांहींहि स्पष्टीकरण करूं गेलं कीं श्वासानं दगा द्यायचा. बाप रे ! —पुढल्या प्रसंगाची मला कल्पनाच करतां येईना !

"माझी अडचण मीं रंगरावापुढं मांडली. तेव्हां तो म्हणाला, पण आतां घरीं जायचंच कशाला ?"

" म्हणजे ?" मीं विचारलं.

" असं कांहीं केलं म्हणजे मी घरीं जात नाहीं."

" मग झोपायचं कुठं रात्रीं ?"

" गांवांत त्याचीहि सोय आहे." रंगराव जाणतेपणानं म्हणाला आणि मग तो मला कुठंतरी घेऊन गेला.

" सकाळीं मी उठलों, तेव्हां एका अनोळखी खोलींत एका पलंगावर मी पडलेलों असल्याचं मला कळून आलं. रंगरावाचा कुठंच पत्ता नव्हता. माझे खिसे मी चांचपून पाहिले, तेव्हां आंतल्या अस्तराखेरीज माझ्या हाताला कांहींच लागलं नाहीं. सारा प्रकार हळूहळू मला आठवूं लागला, आणि ध्यानांतहि येऊं लागला. त्या प्रकारानं माझ्या अंगावर शहारेच यायचे, पण तेवढ्यांत मला दुर्गाची आठवण झाली, आणि मग माझ्या अंगावर शहारे आले.

" घरचा रस्ता चालतांना, आतां घरीं गेल्यावर दुर्गाला तोंड कसं दाखवावं, आणि तिला काय सांगावं, ह्याविषयीं मी विचार करीत होतों. खरा प्रकार तिला सांगणं शक्यच नव्हतं. तिनं मला जिवंत जाळलं असतं. कांहीं तरी बनवून सांगणं अवश्य होतं. येवढ्यांत मला गांवांतल्या दोन्ही जमातीतल्या तेढीची आठवण झाली, आणि मग घरीं गेल्यावर दुर्गाला काय बनवून सांगावं, हें माझ्या डोक्यांत आलं."

एवढं सांगून आबल्या मोठमोठ्यानं हंसला, आणि म्हणाला, " पण घरांतला शांतताभंग टाळण्याकरतां मीं मारलेल्या थापेचा परिणाम गांवांतल्या शांततेचा भंग करण्यांत होईल, याची मात्र मला कल्पना नव्हती ! "

# ११. बूमरँग

कलीनं मंथरेच्या शरिरांत प्रवेश केला होता, तसाच प्रवेश त्यानं श्री. दिडकींच्या शरिरांतहि केला. पण हा प्रवेश त्यानं प्रेमाच्या रूपानं केला. एकदां कलीनं माणसाच्या हृदयांत प्रेमाच्या रूपानं असा प्रवेश केला, कीं मग तो त्याच्या हातून पापं करवतो. माणसाच्या शरिरांत कलीचा ऊर्फ प्रेमाचा प्रादुर्भाव झाला कीं माणूस पापपुण्याच्या किंवा धर्माधर्माच्या कल्पनाकडे दुर्लक्ष करूं लागतो. किंबहुना, 'युद्धांत आणि प्रेमांत सारं काहीं क्षम्य आहे,' असं निर्लज्जपणानं म्हणून आपल्या दुष्कृत्यांवर तो पांघरूण घालण्याचा प्रयत्न करूं लागतो.

नाहींतर, श्री. दिडकींसारखा पोस्टांतला एक सालस सॉर्टर—केवळ हौसेखातर गोष्टी लिहिणारा आणि त्यांतून हिंदु धर्म, आर्य संस्कृति, पतिव्रता धर्म आणि नीति ह्यांचे समाजाला घुटके पाजणारा सदाचारी लेखक अशा मध्यरात्रीच्या वेळीं सारी चराचर सृष्टि निद्रिस्त झाली असतांना, धडधडीत शर्विलकी करीत कशाला बसता !

खोलींतील विजेचा दिवा आपला नेत्रदीपक प्रकाश इतस्ततः फेंकीत होता. सर्वत्र शांत होतं. तावामागून ताव भराभर आक्रमून थकलेल्या श्री. दिडकींच्या पेनची कुरकूर चालली असेल तेवढीच—पण त्या शांततेंत पेनची ती कुरकूर देखील किती मोठी भासत होती ! दारा-खिडक्यांना कड्या घालून जरी श्री. दिडकींनीं आपलं चौर्यकर्म चाल-विलेलं असलं तरी पेनची ती कुरकूर कुणाच्या तरी कानांवर जाईल आणि त्यामुळं आपली त्याला शंका येईल, अशी भीति त्यांना सारखी

वाटत होती. हो, श्री. दिडकी अजून तेवढे निढावलेले नव्हते. कलीच्या प्रभावामुळं ते करीत असलेलं हें पहिलंच मोठं पापकृत्य होतं.

त्यांच्यासमोर एक हस्तलिखित होतं. आणि त्याची नक्कल ते आपल्या हस्ताक्षरांत करीत होते.

साधारण दोनच्या सुमारास त्यांनीं त्या हस्तलिखिताची नक्कल पुरी केली. तिच्यावर कागद डकवून त्यावर 'बुकपोस्ट' असं मोठ्या अक्षरांत लिहिलं आणि खालीं श्री. संपादक 'दांडेकर,' असा पत्ता लिहिला. आणि मग त्यांनीं समाधानाचा एक सुस्कारा सोडून अंगाला आळेपिळे दिले, व आपलं अवघडलेलं शरीर मोकळं केलं.

नंतर मग दिवा मालवून ते आपल्या बिछान्यावर पडले आणि एका सुंदर मुलीचा चेहरा डोळ्यांसमोर नाचत असतांनाच नकळत स्वप्न-सृष्टींत मशगुल झाले!

ह्या साऱ्या प्रकाराला सुरुवात झाली ती साधारण सहा महिन्यां-पूर्वीं श्री. दिडकी ट्रामधून आपला रोजचा घर ते जनरल पोस्ट-ऑफिसपर्यंतचा प्रवास करीत असतांना—

कुठल्याशा आश्रमांत जाऊन चार घांस कसेबसे घशात कोंबले कीं श्री. दिडकी गिरगांवांत पोर्तुगीज चर्चपाशीं म्युझियमकडे जाणारी ट्राम पकडीत, आणि होतां होईल तों खिडकीजवळची जागा पटकावून बसत. तिथून ते बाहेरील दृश्यं पाहण्यांत रंगून जात. रस्त्यावरून दिसणाऱ्या देशोदेशीच्या लोकांत त्यांच्या धांवपळींत, धडपडींत, जीवनकलहांत कुठं एखादं लघुकथेचं बीज सांपडतं कीं काय, हें पाहत त्यांची दृष्टि निरनिराळ्या दृश्यांवरून फिरत राही. पण तो दिवस जरा वेगळा होता त्या दिवशींच त्यांची एक गोष्ट प्रसिद्ध झालेला 'चकोर'चा ताजा अंक त्यांना मिळाला होता, आणि त्यांतल्या आपल्या गोष्टीचीं पारायणं करण्यांत ते गढून गेले होते.

रस्त्यावरून येणाऱ्या जाणाऱ्या माणसांकडे किंवा ट्राममध्यें चढ-

ण्या उतरणाऱ्या चढारू किंवा उतारूंकडे त्यांचं मुळींच लक्ष नव्हतं. त्यामुळं त्यांच्यापुढील बांक केव्हां रिकामा झाला, आणि त्यावर दोन तरुणी केव्हां येऊन बसल्या हें देखील त्यांना कळून आलं नाहीं.

कदाचित् त्या तरुणी ट्राममधून उतरून जाईपर्यंत किंवा श्री. दिडकी स्वत: उतरेपर्यंत ह्या घटनेविषयीं ते अज्ञच राहिले असते; पण वाचतां वाचतां 'चकोर'चं नांव व त्यामागोमाग त्यांचं स्वत:चंहि नांव त्यांच्या कानांवर पडलं आणि ते एकदम आपल्या तंद्रींतून जागे होऊन तें संभाषण ते लक्षपूर्वक ऐकूं लागले. त्या दोन तरुणींमधील जी काळीसांवळी होती, ती आपल्या गौरवर्ण सुंदर मैत्रिणीला विचारीत होती,

"आजचा 'चकोर'चा अंक पाहिलास का तूं?"

"इश्श! मी नाहीं बाई 'दांडेकर' खेरीज दुसरीं मासिकं वाचीत!" ती गोरी सुंदर छोकरी म्हणाली, "आणि 'चकोर' तर कधीं हातांत सुद्धां धरत नाहीं. अगदींच सनातनी आहे तो!"

"पण आजचा अंक वाचच!" ती श्यामला म्हणाली, "श्रीयुत दिडकींची एक सुंदर गोष्ट छापून आलीय् त्यांत!"

श्री. दिडकींना एक मूठभर मांस चढलं.

"दिडकी! कोण दिडकी?" त्या गौरांगीनं विचारलं.

श्री. दिडकींचं मूठभर मांस कमी झालं!

"वा ग! अग, तुला अजून श्रीयुत दिडकींचं नांव माहीत नाहीं?" आश्चर्यानं ती कृष्णा म्हणाली, "श्रीयुत दिडकी हे महाराष्ट्रांतील एक उदयोन्मुख कथालेखक आहेत."

श्री. दिडकींचं तोळाभर तरी वजन वाढलं.

"मी नाहीं बाई असल्या दिडक्या नि पयांच्या गोष्टी वाचीत!" ती सौंदर्यखनी म्हणाली.

श्री. दिडकींचं दोन मुठी मांस कमी झालं.

" खरंच, घरगुती वातावरणाच्या गोष्टी मोठ्या छान लिहितात ते. "— श्यामला.

" लिहूं देत. मला नाही आवडत माजघरांतल्या आजीबाईच्या नि शेवग्या कोथिंबिरीच्या गोष्टी!" ती गौरांगी निर्णायक स्वरांत म्हणाली, " गोष्टी लिहाव्यात प्रोफसर घोडक्यांनींच ! "

" अग पण प्रो. घोडक्यांच्या गोष्टी निराळ्या तऱ्हेच्या नि दिडकीं-च्या निराळ्या तऱ्हेच्या ! " —ती कपिला.

" ह्या तुझ्या दिडकींसमोर प्रो. घोडके म्हणजे रुपया आहेत ! "

हे शब्द ऐकतांच श्री. दिडकीचं शेरभर तरी वजन एकदम कमी झालं. त्या दोघीचा संवाद ऐकत असतांना त्यांच्या वजनांत सारखी तेजीमंदी चालू होती आणि कांहीं कारण नसतां ट्रामला गचके कां बसत आहेत ह्याचं ट्राम-ड्रायव्हरला आश्चर्य वाटत होतं.

" पण वाचून तर पाहा ना दिडकीची आजची गोष्ट ! " त्यांचा ' वकील ' म्हणाला.

" त्यांची गोष्ट ' दांडेकर ' मध्यें आली तरच मी वाचीन. "

' दांडेकर ' मधल्या गोष्टींविषयीं श्री. दिडकींचं मत मुळींच चांगलं नव्हतं. त्यांनीं ' दांडेकर ' कडे पाठवलेल्या एकदोन घरगुती वाता-वरणाच्या आणि सनातन संस्कृतीविषयीं ज्वलज्जहाल अभिमान व्यक्त करणाऱ्या गोष्टी परत आल्या होत्या आणि तेव्हांपासून ' दांडेकर ' गोत्राशीं आपलं गोत्र जुळणार नाहीं. अशी कल्पना करून त्यांनीं तो नाद सोडून दिला होता. तसंच, प्रो. घोडक्यांच्या गोष्टी तरुणतरुणींत प्रिय असल्या तरी दिडकीना त्याच त्याच तऱ्हेच्या त्या प्रेमकथा मुळींच आवडत नव्हत्या. पण सुंदर मुखांतून बाहेर पडलेल्या शब्दांना भलतंच वजन असतं ! आतां त्या सौंदर्यवतीचं तें भाषण ऐकून श्री. दिडकी

आत्मसंशोधनांत कांहीं काळ गर्क होऊन गेले आणि अखेरीस त्या सुंदर मुलीच्या आव्हानाचा स्वीकार न करणं म्हणजे आपल्या लेखन-सामर्थ्याचा अपमान होय, असा विचार त्यांनी ठाम केला. " माझी गोष्ट मी लवकरच ' दांडेकर ' मध्यें छापून आणीन तरच मी नांवाचा दिडकी ! " अशा प्रतिज्ञेचा उच्चार त्या समोरच्या बांकावरील मुलीं-समोर करण्याच्या उद्देशानं त्यानीं तिकडे पाहिलं. त्यानी तोंड उघडलं मात्र, त्यांनीं तें ताबडतोब मिटलं कारण त्या मुली ट्राममधून केव्हांच उतरून गेल्या होत्या, आणि त्यांच्या जागीं दोन दाढीवाले येऊन बसले होते !

कलीचा प्रादुर्भाव श्री. दिडकींच्या हृदयांत ह्या अशा तऱ्हेनं झाला, आणि मग त्यानं त्यांच्या मनाला चिथावणी द्यायला सुरुवात केली. श्री. दिडकी ऑफिसांत येऊन आपल्या खुर्चीवर बसले आणि यांत्रिकपणानं त्यांनीं आपल्या कामाला नेहमीप्रमाणें सुरुवात केली. पण त्यांचं मन आपल्या कामांत रमेना. आपली एक नवी गोष्ट आजच छापून आल्याचा त्यांचा आनंद केव्हांच नाहीसा झाला होता. त्यांच्या एकदोन सहकाऱ्यांनीं कुठल्या तरी वर्गणीदाराचा पोस्टांतून जाणारा ' चकोर ' चा अंक चाळून त्यांच्या गोष्टीविषयीं उल्लेख केला, तरी नेहमींप्रमाणं त्यांना हर्ष झाला नाहीं, कीं गोष्टींतील विशेष मार्मिक शब्दयोजनांची त्यांनीं उकलहि करून दाखविली नाहीं. ती सुंदर पोरगी, ' दांडेकर ' आणि प्रो. घोडके ह्या तिघांनी श्री. दिडकींचं लक्ष आज आपल्या कामांत लागूं द्यायचं नाहीं असा जणूं निश्चयच केला होता. प्रो. घोडक्यांच्या गोष्टी तरुणतरुणींना आवडतात, तितक्या आपल्या गोष्टी आवडत नाहींत ह्याची त्यांना दुःखदायक आठवण झाली होती. ' दांडेकर ' सारख्या नव्या पिढींत लोकप्रिय असलेल्या महाराष्ट्रांतील प्रमुख मासिकाकडून आपल्या गोष्टी परत आल्या आहेत, ही वस्तु-

स्थिति आतां त्यांच्या मनाला शल्यासारखी टोचूं लागली होती. त्यांत आणखी त्या दोघां मुलींमधील संवादांतील शब्दन् शब्द त्यांना परत परत ऐकूं येई, आणि मग ते उदास होत. कलीच्या आहारीं न गेलेल्या त्यांच्या एका मनानं त्यांचं समाधान करण्याचा प्रयत्न केला, " तुझ्या गोष्टी त्या निमगोऱ्या (काळ्या) मुलीला तरी आवडतात ना? तीच खरी रसिक आहे. त्या सुदर मुलीला वाङ्मयांतल कांहीं एक कळत नाहीं. सौंदर्याच्या व्यस्त प्रमाणांत स्त्रीला बुद्धि द्यायची हा ब्रह्मदेवाचा न्यायच नाहीं का! .. " पण कलीला फितुर झालेलं दुसरं मन अशा युक्तिवादाला थोडंच फसतंय्! तें विचारी–आणि श्री. दिडकींना त्यांतच अधिक तथ्यांश वाटे– " तें खर. पण त्या सुदर मुलीला तुझ्या गोष्टी आवडल्या असत्या, तिच्या सुदर मुखांतून तुझ्या गोष्टीविषयीं एकच स्तुतीचा शब्द बाहेर पडला असता, तर त्या काळ्या कुळकुळीत मुलीच्या एका सबध व्याख्यानापेक्षां तुला त्याचं महत्त्व अधिक वाटलं नसतं का? "

त्या दुसऱ्या मनानं त्यांच्या वर्मावर असं अचूक बोट ठेवलं, म्हणजे मग ते एक दीर्घ उसासा टाकीत आणि मग ती सुंदर मुलगी त्यांच्या डोळ्यांसमोर उभी राही. खरंच, किती सुंदर होती ती छोकरी! एखाद्या गोष्टीची नायिका होण्यास किती योग्य! पोवळ्यासारखे ओठ, धनुष्याकृति भुंवया, भुंग्यासारखे डोळे, मोगऱ्यासारख्या दंतकळ्या– मनांतल्या मनांत ते तिचं वर्णन करूं लागले. त्यांनीं निरनिराळ्या पांचसहा तऱ्हांनीं तिचं वर्णन करून पाहिलं; पण त्यांतलं एकहि त्यांच्या पसंतीला उतरलं नाहीं. हजारों लेखकांनीं पूर्वीं हाताळलेल्या सेकंडहँड कल्पनाच त्या वर्णनांत येत, नाहींतर नवीन कल्पना वापरा- वयास गेलं तर त्या त्यांच्या त्यांनाच निर्जीव नी पाचकळ वाटत. तिचं यथायोग्य शब्दचित्र काढणं हें त्यांना दौतभर शाईनं हिमालय पर्वत

रंगवण्यासारखं अशक्यप्राय वाटलं. त्यांच्या मनांत विचार आला, " छे छ ! इतक्या सुंदर मुलीचं वर्णन करावयास प्रो. घोडक्यांची लालित्य-पूर्ण लेखणीच पाहिजे ! .. "

स्वतःच्या मनानंहि अशी पराभूत वृत्ति दाखवावी व प्रो. घोडक्यांना अप्रत्यक्षरीत्या प्रशस्तिपत्र द्यावं ह्याबद्दल त्यांना स्वतःचाच संताप आला.

आपलं डोकं जोरजोरानं हलवून त्या त्रयीच्या त्रासदायक विचारांना आपल्या डोक्यांतून झटकून टाकण्याचा त्यांनीं दोनतीनदां प्रयत्न करून पाहिला. पण मानेला उसण भरण्यापलीकडे व त्यांचं चित्त मिनिट–दोन मिनिट तिकडे आकर्षित होण्यापलीकडे त्याचा कांहीं विशेषसा उपयोग झाला नाहीं. त्या सुदर पोरीनं तर त्यांचा इतका पिच्छा पुरवला होता कीं समोर पडलेल्या राशींतील लिफाफ्यांवर सहाव्या जॉर्जच्या फोटोऐवजीं त्या मुलीचीच छबी त्यांना दिसत होती ! एकदां तर त्यांनीं समोरच्या पितळी कठड्याकडे पाहिलं, आणि तिथंहि त्यांना तोच सुंदर चेहरा दिसला ! " आतां मात्र कमाल झाली बुवा ! " असं उद्गारून ते स्वतःच्या मनोदौर्बल्यावर अतिशय चिडले आणि परत आपल्या कामांत डोकं खुपसून बसले.

" अहो, मिस्टर, जरा ह्या बुकपोस्टाचं वजन करून त्याला कितीचीं तिकिटं लावावीं लागतील तें सांगतां का ? प्लीज ! "

वकिलांच्या खालोखाल कायद्याचं ज्ञान जर कोणाला असेल, तर तें पोस्टांतील कारकुनांना. तुमच्या–आमच्यासारख्या एखाद्यानं जर ही विनंति श्री. दिडकींना केली असती, तर त्यांच्यांतील कायदेपंडित जागा झाला असता आणि एखाद्या मारक्या म्हशीसारखं पाहून त्यांनीं रुक्ष आवाजांत उत्तर दिलं असतं, " इथं वजन करून मिळत नाहीं. पाहिजे तर रजिस्टर करा, म्हणजे वजन करून मिळेल ! "

पण आताची वस्तुस्थिति निराळी होती. ज्या आवाजांत ही विनंति श्री. दिडकीना केली गेली होती, तो आवाज सुकोमल, सुमंजुळ होता. श्री. दिडकीना तो ओळखीचाहि वाटला. त्यानी दचकून पाहिलं, तर ती मघांची सुदर मुलगीच कठड्याशीं सुहास्य वदनानं उभी होती. तिला पाहतांच मघां कठड्यापाशीं तिचा चेहरा आपणाला दिसत होता तो भास तर नव्हे, ह्याची त्यांना जाणीव झाली, आणि अशा मूर्खपणानं आपण तिला ताटकळत ठेवली ह्याचं त्यांना वाईट वाटलं. त्यांचं स्त्रीदाक्षिण्य एकदम सोड्याप्रमाणं फिसफिसत वर आलं, आणि त्यानं त्यांच्यांतील कायदेपंडिताची पूर्ण गळचेपी करून टाकली. त्यांच्या तोंडावर हंसू विलसलं, आणि त्यानी त्या बुकपोस्टाचं वजन क्षणार्धांत करून आणलं. आणि मग त्यांना त्याचा पश्चात्ताप झाला त्या कामाला थोडा वेळ लावला असता, तर तेवढ्यांत तिच्याशी ओळख करून घेतां आली असती. ती संधि वायां घालविल्याबद्दल त्यांना जरा वाईट वाटलं. ते लाचार स्वरांत म्हणाले, "दीड आणा पडेल ह्या बुक-पोस्टाला."

"होय? मला देतां का मग दीड आण्याचीं तिकिटं?"

"हो हो. अवश्य." असं म्हणून, तिकिटं देण्याचं काम आपलं नाही, हा कायदेशीर मुद्दा अजिबात विसरून, श्री. दिडकी तिकीट विकणाऱ्याकडून एक दीड आण्याचं तिकीट घेऊन आले.

"अहो मिस्टर, जरा डिंक आहे का?" तिनं विचारलं.

"हो हो, आहे की."

नंतर दिडकींनीं तिकीट लावून, तें बुकपोस्ट पोस्टांत टाकण्याची कामगिरी आपण होऊन आपल्या शिरावर घेतली. तिच्याजवळ अर्धा आणा सुट्टा नव्हता, तर दोनहि आणे ठेवून घेण्याविषयीं त्यांनीं तिला विनंति केली. ती जावयास निघाली तेव्हां तिच्याशीं ओळख होण्याची

संधि अशी आल्यापावलींच परत चालली हें पाहून त्यांच्या छातींत एक बारीकशी कळ निघाली. जाण्याकरतां वळण्यापूर्वी ती तरुणी अगदीं गोड चेहरा करून म्हणाली, "थँक्स हं, मिस्टर!"

"मिस्टर दिडकी!" कुठून भावनांचा उद्रेक झाला आणि अशा युक्तीनं आपलं नांव तिच्या कानांवर घालण्याची दिडकींना स्फूर्ति झाली, कुणाला ठाऊक! परंतु आपल्या आतांपर्यंतच्या कुठल्याहि गोष्टींतल्यापेक्षां ही प्रतिभेची भरारी त्यांना उच्च वाटली.

"मिस्टर दिडकी!" ती पोरगी आठवण केल्यासारखं करून म्हणाली, "नांव कुठं तरी ऐकल्यासारखं वाटतं!"

"अं?" किंचित् लाजून दिडकी म्हणाले, "लेखक दिडकींचं नांव तुम्हांला ऐकून माहीत असेल!"

"ओ! खरंच की; त्यांचं तुमचं कांहीं नातं आहे का?"

"मीच लिहितों गोष्टी." दुसऱ्या कोणासमोर हें वाक्य उच्चारतांना श्री. दिडकींच्या छातीवरील बटनं तटातट तुटलीं असतीं! पण आतां मात्र त्यांच्या छातीचा परीघ वाढला नाही. एक तर आपण लेखक असूं, अशी तिला आपणाकडे पाहून शंका सुद्धां येऊं नये, ह्या विचारानं ते जरा सर्द झाले होते. शिवाय मघांचा ट्राममधला तो संवाद त्यांच्या स्मरणांत अजून ताजा होता. त्यामुळं एखाद्या आरोपीनं 'होय सरकार, गुन्हा मला कबूल आहे!' असं पिंजऱ्यांतून म्हणावं, तशा आवाजांत त्यांनीं ते वाक्य उच्चारलं होतं.

"अय्या!" थोड्याशा कौतुकानं ती म्हणाली, "पण तुम्ही 'दांडेकर'कडे कां नाहीं गोष्टी पाठवीत? प्रोफेसर घोडक्यांसारख्या गोष्टी लिहा तुम्ही!"

"प्रोफेसर घोडक्यांच्या गोष्टी फार आवडतात वाटतं तुम्हांला?"

"घोडके! प्रोफेसर घोडके! त्यांच्या गोष्टी वाचतांना स्वर्गीय

आनंद मिळतो! " हे शब्द उच्चारतांना तिनं आपली मान किंचित् मागं झुकवली होती, तिचा सैलसा अंबाडा तिच्या किंचित् पोक आलेल्या पाठीवर रुळत होता आणि आपले भ्रमरासारखे काळेभोर टपोरे डोळे तिनं आपल्या कमलदलांसारख्या तांबुस नाजुक पापण्यांनीं अर्धवट झांकून घेतले होते. थोडचा वेळानं एक दीर्घ सुस्कारा टाकून ती आपल्या ब्रह्मानंदांतून जागी झाली.

ह्याच क्षणी कसंहि करून—प्रो. घोडक्यांचं अनुकरण करून का होईना—पण आपल्या गोष्टी 'दांडेकर' मध्यें छापून आणण्याची दिडकींची मघांची ती साधी प्रतिज्ञा भीष्मप्रतिज्ञेंत रूपांतर पावली. 'फुटो हें मस्तक, तुटो हें शरीर!' असं म्हणणाऱ्या तुकोबाइतकाच त्यांचा आतां ह्या बाबतीत कृतनिश्चय झाला होता. ह्यानंतरचा आयुष्यांतील प्रत्येक क्षण ह्या एकाच ध्येयपूर्ततेकरतां ते जगूं लागले.

ती सुंदर मुलगी ब्रह्मानंदांत विहार करीत असतांनाचं तें मघाचं चित्र राहून राहून त्यांच्या मनश्चक्षूंसमोर उभं राही; आणि एक उसासा टाकून ते स्वतःलाच प्रश्न करीत, "दिडकी! श्रीयुत दिडकी! मला त्यांच्या गोष्टी फार आवडतात! असं ती सुंदरी असाच अभिनय करून कधीं तरी म्हणेल का?"

श्री. दिडकी पोस्ट ऑफिसांत सॉर्टर होते. आपल्यासारख्या प्रतिभावान् तरुणानं पोस्टांत लिफाफ्यांवर व कार्डांवर शिक्के मारण्यांत आयुष्याचा बहुमोल काळ फुकट दवडावा, हें त्यांना पसंत नव्हतं. आणि तेंहि पुष्कळसं खरंच होतं. पोस्टांतील एकंदर वातावरण कलांच्या हौशीची वाढ करण्याला तितकंसं पोषक नसतं. एखाद्या हौशी कलांची आवड असलेल्या, दिलदार माणसाला पोस्टांत नोकरीला लावा, आणि मग त्याचं केंविलवाणं रूपांतर झालेलं थोड्याच दिवसांत पाहा. मळकट कपड्यांचा, स्वतःच्या संसाराखेरीज दुसऱ्या कशांत

गोडी नसलेला, पाठींत पोक आलेला, मारक्या म्हशीप्रमाणं दिसणारा आणि जाड भिंगांचा चष्मा लावणारा, अशा एका अरसिकांतल्या अरसिक प्राण्यांत तो रूपांतर पावलेला तुम्हांला दिसून येईल. प्रत्यक्ष तानसेनाच्या गायनाचे सुरेल स्वर त्याच्या कानांवर पडले तरी तो थबकणार नाहीं. रविवर्म्यांच्या उत्कृष्ट कलाकृतीकडे तो ढुंकूनहि पाहणार नाहीं, किंवा उत्तमांतील उत्तम पुस्तक त्याला वाचावयास दिलं तर तो त्यावरची धूळ देखील झटकणार नाहीं. पोस्टांतील रुक्ष वातावरणांत, सहारा वाळवंटांत पडलेल्या बीजाप्रमाणं माणसाची सारी रसिकता, कलासक्ति करपून निघते, असा जगाचा अनुभव आहे. पण आपल्या श्री. दिडकींचं नशीब शिकंदर म्हणून ते पोस्टांतील ह्या कलामारक वातावरणाला पुरून उरले होते. एवढंच नव्हे तर उलट त्यांची वाचनाभिरुचि आणि त्यांच्यांतील 'लेखकाचा जंतु' पोस्टांतील विशिष्ट सोयींमुळें वाढीलाच लागले होते. त्यांचा लेखक होण्यास पोस्टाचा त्यांनीं वाचनालयाप्रमाणं करून घेतलेला उपयोगच पुष्कळसा कारणीभूत झालेला होता. आतांहि पोस्टांत बसल्या बसल्या प्रो. घोडक्याच्या नव्या-जुन्या गोष्टींचा त्यांनी मार्मिक अभ्यास सुरू केला. आणि थोड्याच दिवसांत प्रो. घोडक्यांच्या गोष्टींच्या यशाची गुरुकिल्ली त्यांना सांपडली.

एखाद्या रोगावर डॉक्टरचं जसं एखादं ठराविक 'प्रिस्क्रिप्शन' असतं, तसं प्रो. घोडक्यांचंहि गोष्टीचं एक प्रिस्क्रिप्शन होतं. आणि त्याला अनुसरून त्यांच्या साऱ्या गोष्टी बनवण्यांत आल्या होत्या. तें प्रिस्क्रिप्शन खालीलप्रमाणं होतं.

| | | |
|---|---|---|
| नायिकेचं वर्णन | 3 p | ( ३० ग्रेन ) |
| प्रेमाचं कथानक | 3 iii | (१२० ग्रेन) |
| विनोद | 3 p | ( ३० ग्रेन) |

| | | |
|---|---|---|
| सनातन्यांना शिव्या | 3 p | ( ३० ग्रेन) |
| सनातन्यांची थट्टा | 3 p | ( ३० ग्रेन) |
| पुरोगामित्वाचा उपदेश | 3 i | ( ६० ग्रेन) |
| देशांतील चालू वातावरण | 3 i | ( ६० ग्रेन) |
| गोड शेवट | 3 iii | (१८० मिनिम) |
| गुलगुलित भाषा | adz iii | (तीन औंस) |

mft एक गोष्ट घोळून घोळून एका बैठकींत वाचणें.

प्रो. घोडक्यांच्या गोष्टीचा अभ्यास करून जेव्हां दिडकींना ही मुख्य किल्ली सांपडली, तेव्हां त्यांना मोठाच हुरूप चढला, व ह्या प्रिस्क्रि- प्शनबरहुकूम गोष्टी लिहून त्या 'दांडेकर'कडे पाठविण्याचा त्यांनीं सपाटा सुरू केला! पण त्या गोष्टींनी त्यांच स्वतःचंच समाधान होईना. 'तो' आणि 'ती' चीं तीच तीच कथानकं जरासा फरक करून हाताळण्यांत त्यांना मौज वाटत नसे. त्यांचा पिंड पुरोगामित्वाला साजेसा नव्हता. गोष्टींतील त्यांचा पुरोगामित्वाचा उपदेश मारून मुटकून आणल्यासारखा दिसे. त्यांच्या आजूबाजूचं पोस्टांतील वातावरण बिनोदाला पोषक नव्हतं. त्यांच्या गोष्टींतील विनोद ओढूनताणून आणलेला दिसे. आणि सनातन धर्माची टिंगल करणं तर त्यांच्या अगदीं जिवावरच येई. त्यामुळं झालं काय, तर त्यांच्या त्या गोष्टी म्हणजे प्रो. घोडक्यांच्या गोष्टींच्या निर्जीव प्रतिकृति दिसूं लागल्या. आणि जेव्हां त्या 'दांडेकर' कडून 'बूमरँग' प्रमाणं एकामागून एक परत येऊं लागल्या, तेव्हां दिडकींनाहि दुःख झालं तरी आश्चर्य वाटलं नाहीं.

मधून मधून दिडकी अगदीं उदासीन दिसत. उगाचच कुणावर तरी चिडत. पोस्टांतील वातावरणाचा स्वाभाविक परिणाम म्हणून जरी त्यांची स्नेही मंडळी तिकडे दुर्लक्ष करीत, तरी त्यांची ही वर्तणूक निराळ्याच वस्तुस्थितीची निदर्शक असे.

एक तर त्या दिवशी त्यांची एखादी गोष्ट ' दांडेकर ' कडून साभार परत आलेली असे; किंवा आपली एखादी गोष्ट बुकपोस्टानं पाठवण्याकरतां आशा—अर्थात ती सुदर मुलगी—पोस्टांत येऊन गेलेली असे. तशी ती आली कीं, " पाठवली का हो ' दांडेकर 'कडे गोष्ट ?" असं ती न चुकतां दिडकींना विचारायची आणि कलीच्या सल्ल्यानं " नाहीं हो ! अजून लिहायला वेळच झाला नाहीं !" असं असत्यवचन करून दिडकी वेळ मारून न्यायचे. श्री. दिडकींचं मधूनमधून उचल खाणारं औदासीन्य आणि चिडखोरपणा ह्या प्रसंगाचेच परिणाम असत.

आज दुपारीं तर कहरच झाला. आपली गोष्ट ' बुकपोस्ट ' करण्याकरतां आशा आली, आणि तिन आपला नेहमींचा प्रश्न दिडकींना विचारला, ' पाठवली का ' दांडेकर ' कडे गोष्ट ? "

" अं ? नाहीं हो ! प्रोफेसर घोडक्यांसारखी गोष्ट अजून झालीच नाहीं लिहून ! " दिडकी म्हणाले.

" नाहींच होणार ! " आशा हेटाळणीनं म्हणाली, " त्यांच्यासारखी गोष्ट लिहिणं तितकं सोपं नाहींच मुळी ! – त्यांचं वाङमयचौर्य केलं तरच तुम्हांला तशी गोष्ट लिहितां येईल ! "

अपमान, उपहास, हेटाळणी इत्यादींनी भरलेलं तें वाक्य तिनं किती सहज दिडकीच्या हृदयांत खुपसलं ! त्या वेदनांच्या भरांत दिडकी बोलून गेले, " बरंय्. येत्या ' दांडेकर 'च्या अंकांत माझी गोष्ट येते कीं नाहीं पाहा ! "

" शक्य नाहीं ! "

" अगदीं शक्य आहे !" दिडकीहि आतां इरेला पेटले होते. " गोष्ट आली तर काय द्याल ? "

" काय पाहिजे तें ! "

"पाहिजे तें? पाहा बरं!" त्यांनीं हीं वाक्य कशा रीतीनं उच्चारलीं कुणाला ठाऊक; पण त्यांच्या बोलण्यांतील गर्भितार्थ आशेच्या बरोबर लक्षांत आला!

"हो, पाहिजे तें!" आशेनं हें वाक्य इतक्या शांतपणानं आणि आत्मविश्वासानं उच्चारलं, कीं श्री. दिडकींची गोष्ट 'दांडेकर' मध्यें कधीच येणं शक्य नाहीं, ह्याविषयीं तिला अगदीं शंभर टक्के खात्री असलेली दिसली! तें पाहून श्री. दिडकीच्या हृदयाला चरकाच बसला.

"वाङ्मयचौर्य केलं तरच घोडक्यांसारखी गोष्ट तुम्हांला लिहितां येईल." हें आशेचं वाक्य नंतर सारखं त्यांच्या कानांत घुमत राहिलं होतं. त्याच्या आठवणीनं एकीकडे त्यांचा राग भडकत होता, तर दुसरीकडे एखादं घोडकेछाप कथानक शोधून काढण्याकरतां त्यांचा जीव तगमगत होता. "वाङ्मय-चौर्य केलं तरच..."

हें वाक्य शंभराव्या वेळीं त्यांच्या कानांत घुमायला लागलं, आणि तें अर्ध्यावरच तुटलं. ज्या वाक्यानं आपला अपमान झाला आहे असं त्यांना वाटत होतं, त्याच वाक्यानं, आणि ज्या नोकरींत आपलं आयुष्य फुकट चाललं आहे असं त्यांना वाटत होतं, त्याच नोकरीनं, त्यांना ह्या प्रसंगांतून सुटण्याचा मार्ग दाखवून दिला होता. ते जागेवरचे उठले, आणि पोस्टांतल्या पत्रांच्या ढिगाची चाळवाचाळव करूं लागले. थोड्या-च वेळांत त्यांना हवं असलेलं 'बुकपोस्ट' मिळालं, आणि त्याच्या डोळ्यांत आनंद चमकूं लागला.

त्या बुकपोस्टांतून प्रो. घोडक्यांनी 'दांडेकर'करतां एक ताजी गोष्ट पाठवलेली होती. मघांच श्री. दिडकींनीं ती वाचून पाहिली होती.

दिडकींना सुचलेला उपाय अगदीं सोपा होता. ह्या गोष्टीची आपल्या हस्ताक्षरांत नक्कल करायची, गोष्टीचं नांव बदलायचं, व ती गोष्ट 'दांडेकर'कडे आपल्या नांवावर पाठवून द्यायची. मग खुद्द प्रो.

घोडक्यांच्या लेखणींतून उतरलेली ती गोष्ट परत करायची काय छाती आहे 'दांडेकर'च्या संपादकाची? आशेशीं लावलेलो पैज आपण आतां जिंकलीच! 'काय पाहिजे तें' द्यायचं कबूल केलंय तिनं...

पण प्रो. घोडक्यांनीं आपल्यावर वाङ्मय-चौर्याचा आरोप केला तर! केला तर केला! त्यांना थोडाच तो सिद्ध करतां येणार आहे! ती गोष्ट त्यांचीच ह्याबद्दल त्यांच्याजवळ काय पुरावा आहे? आणि नोकरीवर गदा आली तर! अं:! पाहूं पुढचं पुढं!.... आणि आशे-करतां कुठला स्वार्थत्याग मोठा आहे!

आणि त्या दिवशीं रात्री दोन वाजेपर्यंत त्यांचा जो उद्योग चालला होता, तो हाच. दुसऱ्या दिवशीं त्यांनीं ती गोष्ट 'दांडेकर' कडे पाठ-वूनहि दिली. ही गोष्ट 'दांडेकर'मध्यें छापून येणारच ह्याविषयीं ते अगदीं निःशंक होते. "आपल्या गोष्टीचा 'दांडेकर' करतां साभार स्वीकार केला आहे. 'दांडेकर'ला बरचेवर असेंच लेखनसहाय्य करावें" ह्या अर्थाचं पत्र 'दाडेकर'च्या संपादकाकडून यायचं तेवढं आतां बाकी राहिलं होतं. तसं पत्र आलं की आपण तें आशेला दाखवू नि तिनं 'पाहिजे तें' द्यायचं कबूल केलं आहे!

त्या पत्राची ते चातकाप्रमाणं वाट पाहत राहिले.

अखेरीस पांचसहा दिवसांनीं ज्या पत्राची ते एवढ्या उत्सुकतेनं वाट पाहत होते, तें 'दांडेकर'च्या संपादकांचं पत्र त्यांना आलंच. पाकिटावरील 'दाडेकर' चं छापील नाव वाचून, त्यांच्या हृदयांत आनंदाचं वादळ माजलं—

पण पत्राबरोबर एक बुकपोस्टहि आलेलं पाहून त्यांच्या छातींत धस्स झालं!

बूमरँगप्रमाणं आपण पाठवलेली हीहि गोष्ट परत आली आहे कीं काय?

त्यांनीं थरथरत्या हातांनीं तें पत्र फोडून वाचावयास सुरुवात केली.

“सा. न. वि. वि.

आपली गोष्ट साभार परत पाठवीत आहों. पण आपणांला एक सूचना करावीशी वाटते म्हणून हे पत्र मुद्दाम लिहीत आहों. आपली लेखनशैली पाहून आपणांला प्रो. घोडक्यांसारख्या गोष्टी लिहिणं थोडयाशा परिश्रमानं साध्य होईल असा भरंवसा वाटतो. तरी आपण त्यांच्या गोष्टींचा सूक्ष्म अभ्यास करून त्या धर्तीवर गोष्टी लिहून पाठविल्यास त्यांना ‘दांडेकर’ मध्यें प्रसिद्धि देण्यासंबंधीं अवश्य विचार करण्यांत येईल.”

## मनोहर

## प्र का

### शिल्लक आहेत

(३) फरेंच राज्यक्राति : न. चिं. केळकर २॥
(९) राका : सौ संजीवनी मराठे १।
(१०) प्रतारणा : प्रा. दांडेकर २
(११) संसारसोपान : सौ गिरिजाबाई केळकर १।
(२२) संस्कृतिसंगम : प्रा. केळकर ६
(२३) चंपी आणि मोत्या १॥
(२५) वेदप्रकाश : पाठकशास्त्री १०
(३०) जीवनविहार : कालेलकर २
(३१) स्मरणसांखळी : देशपांडे ६
(३२) रानोमाळ : रा. वि. फडतरे २॥
(३३) साहित्यविहार : प्रा. केळकर ३
(३५) गांवरान गीता : न. चिं. केळकर २
(३६) काव्यालोचन : प्रा. केळकर ५
(३७) हसरा निर्माल्य व चिमण्या : कमलाबाई देशपांडे २
(४०) 'नरसिंह' केळकर : वि. उ. वैद्य १॥
(४१) ज्ञानेश्वरी-सर्वस्व : न. चिं. केळकर ५
(४२) ठेंगणें अस्मान : श्री. देशपांडे ४
(४३) मानसचित्रें : गंगाधर गाडगीळ २॥
(४४) उपायन : म. म. केळकर २॥
(४६) संस्कृत काव्याचे पंचप्राण : डॉ. के. ना. वाटवे ६
(४७) काव्यविहार : मा. पटवर्धन
(४८) Location of Lanka : Sardar Kibe २
(४९) तिसऱ्या महायुद्धाच्या छायेंत : य. न. केळकर ५
(५०) हिंदी हीच आमची राष्ट्रभाषा : शं. दा. चितळे ३
(५१) हिंदी क्रिकेट : र. गो. सरदेसाई ५
(५२) स्त्रीगीतें : कमलाबाई देशपांडे ३
(५३) मा थेन् थेन् : कथासंकलन ३
(५४) रत्नाकार : द. पां. खांबेटे २
(५५) गोकुळच्या गोळणी : पं. महादेवशास्त्री जोशी २
(५७) पाऊलवाट : श्री. देशपांडे ४
(५८) आमच्यापुढील प्रश्न ?? २॥
(५९) कमलाक्षीची कहाणी : चंद्रमा यत्नशील ॥
(६०) टालडुप्पो वाँगिमाडूऽऽ : अ. बा. वर्टी ३

ग्रंथमाला

शनें

## शिल्लक नाहींत

(१) तिरंगी नवमतवाद : न. चिं. केळकर
(२) विस्तवाशीं खेळ : वा. म. जोशी
(४) हास्य–विनोद–मीमांसा : न. चिं. केळकर
(५) सहारा : श्रीधर देशपांडे
(६) बलिदान : न. चिं. केळकर
(७) 'समग्र केळकर' वाङ्मय : खंड १२
(८) चंद्रगुप्त : न. चिं. केळकर
(१२) न्याहारी : वि. म. कुलकर्णी
(१३) वादळी वारे ( आ. दु. ) : प्रा. केळकर
(१४) इब्सेन : ग. भा. निरंतर
(१५) उन्माद : प्रा. फडके
(१६) बीजांकुर : शांताराम आठवले
(१७) दुसरी सांवली : श्री. बोकील
(१८) कागदी विमानें : र. गो. सरदेसाई
(१९) बोकिलांच्या गोष्टी :
(२०) गुप्त प्रायश्चित्त : प्रा फडके
(२१) प्रदक्षिणा : (वाङ्मयीन समालोचन)
(२४) सायंतारा : श्रीधर देशपांडे
(२६) लयलूट : कथासंग्रह
(२७) Hindu-Pad-Padashahi : Savarkar
(२८) पालापाचोळा : न. चिं. केळकर
(२९) विसर्जन : वि. म. कुलकर्णी
(३४) ससेमिरा : सरदेशमुख
(३८) साहित्याचा ध्रुवतारा : प्रा. वाळिंबे : किं. ३ रुपये.
(मिळण्याचें ठिकाण : बळवंत पुस्तक भांडार, मुंबई ४.)
(३९) From Quit India to split India : Bhide Guruji.
(मिळण्याचें ठिकाण : श्री. अ. स. भिडे, ८७ शिवाजी पार्क, दादर)
(४५) नेताजींचें सहवासांत : पु. ना. ओक
(५६) सुलभ पाकशास्त्र : सौ. गिरिजाबाई केळकर : किं. २ रुपये.
(मिळण्याचें ठिकाण : बापट आणि कंपनी ठाकूरद्वार, मुंबई २.)

## डॉ. वर्टी यांचें वाङ्मय

☆ कादंबरी

अभिनय

नवा धर्म

☆ नाटक

राणीचा बाग

☆ लघुकथा

मुमताज

रुपेरी स्वप्न

☆ लघुनिबंध

पिसारा

☆ विनोदी कथा

दंतकथा

टालडुप्पो वाँगिमाडू ऽऽ